### टीपा

८९७ चञ्चलाक्षी, . चन्द्रवत्सिका (पि ६/३६), गौरी (पि ८/५ हे,), प्रमुदितवदना (हे २/१८२), मन्दाकिनी (गछ २/६५), मागे प्रभा ३९८ पहा. ८९८ "ऋजुगति"; या वृत्ताला रणपिङ्गलकार किरात वा कुटिलगति (रपि ८४२) म्हणतो; परन्तु कुटिलगति नावाचें निराळेंच वृत्त आहे, मागे १०१ पहा. ८९९ "नौ रौर्निशा डैः" (हे २/३१५), नाराचक (पि ८/१७), नाराचिका (गछ २/२२३), तारका (कद ४/८५), कोकिला (नि ११५), महामालिका (के परिशिष्ट), सिंहविक्रीडित (केनिआ ६५). ९०० लालसा, "सैका वसुविरतिस्तनौ रैश्चतुर्भिर्युता लालसा" (गछ २/१८९).

९०१ 'हेमकाञ्ची'. ९०२ मेघमाला (म १६/१०३–१०४), "नौ र्स्मेघमाला" (हे २/३६८), भृङ्गाञ्जनीलालफा (हे). ९०३ "नार्श्च घण्डवृष्टि" (हे २/३११), चण्डवृष्टिप्रपात (पि ७/३३). ९०४–९१० "प्रतिचरणविवृद्धरेफाः स्युरर्णार्णवव्यालजीमूतलीलाकरोद्दाममशङ्खादयः" (के ३/११३). ९११–९३० वृत्तरत्नाकरावरील नारायणभट्टीय व्याख्या (पृ. १०६) पहा.

## परिच्छेद ६ वा

## अर्धसम-वृत्तें

अर्धसमवृत्तांतील चतुष्पदी ही दोन प्रकारांनी सिद्ध होअू शकते. पहिले दोन चरण अेका लगावलीचे आणि पुढील दोन चरण भिन्न लगावलीचे मिळून जी चतुष्पदी होअील तिचें वृत्त अर्धसम समजायला प्रत्यवाय नसावा. अशा अर्धसम रचनेचीं आढळलेलीं अुदाहरणें पुढील अध्यायांत म्हणजे वृत्तविहारांत दिली आहेत. परन्तु (९३१) सौम्या आणि (९३२) ज्योति (मागे पृ. २३, ९२ पहा). हीं दोन वगळल्यास या प्रकारच्या अर्धसमवृत्तांना अद्यापि मान्यता मिळालेली नाही.

अितर अर्धसमवृत्तें हीं दोन निरनिराळ्या लगावली मिळून जी रचना होते तिच्या द्विरावृत्तीने होतात. हीं अर्धसम वृत्तें सुद्धा साहजिकपणेंच सम-

वृत्तांप्रमाणे अनावर्तनी, पद्मावर्तनी, अभ्यावर्तनी, भृङ्गावर्तनी आणि हरावर्तनी अशीं आहेत.

## अनावर्तनी अर्धसम-वृत्तें

### ५० आख्यानकी-वर्ग

९३३ आख्यानकी {
[— — v — — | v v — v — —] अिन्द्रवज्रा
[v — v — — | v v — v — —] अुपेन्द्रवज्रा

९३४ विपरीताख्यानकी {
[v — v — — | v v — v — —] अुपेन्द्रवज्रा
[— — v — — | v v — v — —] अिन्द्रवज्रा

९३५ शिशिरा {
[— — v — — | v v — v — v —] अिन्द्रवंशा
[v — v — — | v v — v — v —] वंशस्थ

९३६ हरिणप्लुता {
[v v — v v — | v v — v —] विदुपी
[v v v — v v — | v v — v —] द्रुतविलम्बित

९३७ मकरावली {
[v v v — v v — | v v — v —] द्रुतविलम्बित
[v v v — v v — | v v — | v v — v —]
"प्रगुणीकृता"

९३८ 'तनुतमा' {
[v v v — v v — | v v — v —] द्रुतविलम्बित
[v v — v — v v v — v v —] प्रमिताक्षरा

#### टीपा

९३३ आख्यानकी "ताजगगा जतजगगा आख्यानकी. ९३४ "व्यत्यये विपरीतादिः" (हे ३/६). ९३५ ताजरा जतजरा शिशिरा. (वैद्यनाथ शास्त्री वरकल यांची टीप के पृ. ७९).

९३६ हरिणप्लुता (वृ १०३/२८, हे ३/१), हरिणोद्गता (कद ४/११४), "त्रिसकारविरतैर्भवतो लगौ। नभभरैश्च गणैर्हरिणप्लुतम्" (अुवृ १०३/२८). ९३७ "नभभरा नभिरा मकरावली" (हे ३/१०). ९३८ नभभाः सजसाः 'तनुतमा.'

## पद्मावर्तनी अर्धसमवृत्तें

### ५१ केतुमतीवर्ग

९३९ केतुमती { [∪ ∪ – | ∪ – ∪ ∪ ∪ – | –] प्रमिता
[– ∪ ∪ | – ∪ – ∪ ∪ ∪ | – –] "नवशालिनी"

९४० शिला { [∪ ∪ – ∪ – S] मदनप्रिया
[∪ ∪ – ∪ ∪ – | ∪ ∪ – ∪ – S] विदुषी

९४१ मृगाङ्कमुखी { [∪ ∪ – ∪ – S] मदनप्रिया
[∪ ∪ | मदिरा] दुर्मिल

९४२ अच्युतक { [| ∪ ∪ ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ –] द्रुतपादगति
[| – ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ –] चित्रगति

९४३ 'मधुपिङ्गल' { [∪ ∪ | – ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ –] तोटक
[– | – ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ –] मोटक

९४४ 'सुविनीता' { [| – – ∪ ∪ – | ∪ ∪ – –] "कपिलाक्षी"
[| – ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ – –] दोधक

९४५ वेगवती { [| ∪ ∪ – ∪ ∪ – | ∪ ∪ – –] मेघवितान
[| – ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ ∪ – –] दोधक

९४६ कौमुदी { [∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ – | ∪ ∪ – ∪ ∪]
[| ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ – | ∪ – – – ∪ –] प्रभा

९४७ 'क्षुरक्षीण' { [| – – ∪ ∪ – | ∪ – ∪ –] "सुलोचना"
[| – – – ∪ ∪ | – ∪ – ∪ –] शुद्धविराट्

९४८ वियोगिनी { [| ∪ ∪ – ∪ ∪ – | ∪ – ∪ –] 'चारुलोचना'
[| ∪ ∪ – – ∪ ∪ | – ∪ – ∪ –] सीधु

९४९ अपरवक्त्र { [| ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ – | ∪ – ∪ –] प्रसभ
[| ∪ ∪ ∪ ∪ – ∪ ∪ | – ∪ – ∪ –] मालती

९५० 'श्रुतकीर्ति' { [| – – ∪ ∪ – | ∪ – ∪ –] "सुलोचना"
[| – ∪ – ∪ ∪ ∪ | – ∪ – ∪ –] रथोद्धता

९५१ 'सम्पदा' { [| ∪ ∪ – ∪ ∪ – | ∪ – ∪ –] 'चारुलोचना'
[| – ∪ – ∪ ∪ ∪ | – ∪ – ∪ –] रथोद्धता

| | | |
|---|---|---|
| ९५२ 'माण्डवी' | [\|∪—∪——\|∪—∪—] | 'नृपात्मजा' |
| | [\|———∪∪\|—∪—∪—] | शुद्धविराट् |
| ९५३ 'अुर्मिळा' | [\|∪—∪——\|∪—∪—] | 'नृपात्मजा' |
| | [\|∪—∪——\|—∪—∪—] | 'चारुलक्षणा' |
| ९५४ 'विदाहिनी' | [∪—∪——\|∪—∪—] | 'नृपात्मजा' |
| | [\|—∪—∪∪∪\|—∪—∪—] | रथोद्धता |
| ९५५ 'शुभोदय' | [∪—∪∪∪—\|∪—∪—] | 'कटाक्षललिता' |
| | [—∪—∪∪∪\|—∪—∪—] | रथोद्धता |
| ९५६ अुपचित्र | [\|∪∪—∪∪—\|∪∪—∪—] | विदुषी |
| | [\|—∪∪—∪∪\|—∪∪——] | दोधक |
| ९५७ द्रुतमध्या | [\|—∪∪—∪∪\|—∪∪——] | दोधक |
| | [\|∪∪∪∪—∪∪\|—∪∪——] | तामरस |
| ९५८ 'विपुलकरा' | [\|∪∪∪∪—∪∪\|—∪∪——] | तामरस |
| | [\|—∪∪—∪∪\|—∪∪——] | दोधक |
| ९५९ करिणी | [\|———∪∪\|—∪∪——] | "अुन्नत" |
| | [\|∪∪——∪∪\|—∪∪∪∪—] | नगमहिता |
| ९६० विकसितलीला | [\|—∪∪—∪∪\|——∪∪—] | कलस्वन |
| | [\|∪∪∪∪—∪∪\|∪∪∪∪——] | मदललिता |
| ९६१ 'वरमानिनी' | [\|—∪∪—∪∪\|—∪∪—∪∪] | मोदक |
| | [\|—∪∪—∪∪\|—∪∪—ऽ∪\|—] | |
| ९६२ भद्रविराट् | [\|——∪∪—\|∪—∪——] | "अिरा" |
| | [\|———∪∪\|—∪—∪—\|—] | अेकरूप |
| ९६३ मालभारिणी | [\|∪∪—∪∪—\|∪—∪——] | "अमला" |
| | [\|∪∪——∪∪\|—∪—∪—\|—] | बधिरा |
| ९६४ पुष्पिताग्रा | [\|∪∪∪∪∪—\|∪—∪——] | काममत्ता |
| | [∪∪∪∪—∪∪\|—∪—∪—\|—] | सुवक्त्रा |
| ९६५ दिविजकल्पलता | [—∪—∪∪∪\|—∪—∪—] | रथोद्धता |
| | [∪∪∪—∪∪∪\|—∪—∪—] | प्रियंवदा |
| ९६६ मञ्जुसौरभ | [\|∪∪∪∪—∪∪\|—∪—∪—] | मालती |
| | [\|∪∪—∪—ऽ\|∪∪———\|∪—∪—] | "सौरभी" |

९६७ मितभाषिणी - { [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ | ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ | – ]
[ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ | ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – ] प्रमिताक्षरा

९६८ मानिनी
{ [ – ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ | ⏑ – ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] "सुरसरिता"
[ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – ] 'अुडुपथ'

९६९ रविप्रभा
{ [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ]
[ – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ऽ ⏑ – ⏑ ⏑ | – ]

९७० 'अन्तर'
{ [ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ] मदिरा
[ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ] नलिनी

९७१ 'अुत्तमवंशा'
{ [ ८ल | ८ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – – ] "तिलकित"
[ ⏑ ⏑ | – – – ⏑ ⏑ | – – ] सम्बुद्धि

९७२ शिखा { [ ८ल | ८ल | ८ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]
[ ८ल | ८ल | ८ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]

९७३ खञ्जा { [ ८ल | ८ल | ८ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]
[ ८ल | ८ल | ८ल | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]

## टीपा

९३९ "सजसगा भनंगगाः केतुमती" (हे ३/५), "असमे सजौ सगुरुयुक्तौ । केतुमती समे भरनगाद्गुः" (के ४/५). ९४० "स्लगा सिल्गा अिला" (हे ३/२८).

९४१ "स्लगाः मृर्मृगाल्कमुखी" (हे ३/२९). ९४२ नजजल्गा भिगौ अच्युतक (ना २०७). ९४३ सीः तजजल्गा 'मधुपिङ्गल'. ९४४ तज्या भिगगा 'सुविनीता'. ९४५ वेगवती (हे-३/२), आपातलिका (हे). "स्यमे प्रथमाऽरहीने । दोधकमेवाद्दि वेगवती स्यात्" (गछ ३/२).

९४६ "अयुजि ननसमाः समकेऽपि तु । नयुगरयुगलं तदा कौमुदी" (गछ ३/१३). ९४७ तजप मरजगाः 'सुन्दर्शण'. ९४८ वियोगिनी

( मल्लिनाथ, ममच २१ ), प्रबोधिता ( हे ३/१२ ), सुन्दरी ( गछ ३/६ ), ललिता (केनिआ ७७), " विषमे ससजा गुरुः समे । सभरालोऽथ गुरुर्वियोगिनी" ( मल्लिनाथ कुस ४/१ ). ९४९ अपरवक्त्र, " ननरलगयुतौ नजौ जरौ भवति सदापरवक्त्र मीदृशम्" ( श्रुवबृ १०३/१५ ). ९५० तजरा रनरल्गाः 'श्रुतकीर्ति'.

९५१ ससजगा रनरल्गाः 'सम्पदा'. ९५२ जतरा मसज्गा 'माण्डवी'. ९५३ जतरा जमज्गा 'उर्मिळा.' ९५४ जतरा रनरल्गा 'विदाहिनी.' ९५५ जरजगा रनरल्गाः 'शुभोदय'.

९५६ उपचित्र ( स्वछ २/३, हे ३/२ ). "विषमे यदि सौ सलगा दलें। भौ युजि भाद् गुरुकावुपचित्रम्" ( के ४/१ ). ९५७ द्रुतमध्या ( हे ३/२, कद ४/११५ ), चलमध्या ( स्वछ २/५ ), श्रुतमध्या ( निस १३५ ); " भत्रय मोजगतं गुरुणी चेत्। युजिच नजौ ज्ययुतौ द्रुतमध्या" ( के ४/२ ). ९५८ द्रुतमध्याव्यत्यये 'विपुलकरा'. ९५९ " मसागाः सभासाः करिणी " (हे ३/११) ९६० " भातल्गा न्जन्सगा विकसितलीला " ( हे ३/१६ ).

९६१ भमभभा भमभरा 'यरमानिनी'. ९६२ भद्रविराट् ( हे ३/४ ); "ओजे तपरौ जरौ गुरुश्चेत्। म्सौ ज्गौ ग् भद्रविराड् भवेदनोजे" ( के ४/४). ९६३ सज्गगाः स्भर्या मालभारिणी ( हे ३/१५ ), नितम्बिनी ( हे ); फलिताग्र ( ममच २२ ). "विषमे ससजा यदा गुरूचेत् सभरा येन तु माल भारिणीयम्" ( गछ ३/१५ ). ९६४ पुष्पिताग्रा ( हे ३/१४ ), " भवति जगति नौ ततश्च रो यो । नजसहितैर्जरगैश्च पुष्पिताग्रा " ( श्रुवबृ १०३/१७ ). ९६५ रनरल्गा नमज्गा दिविजकल्पलता ( ना २०८ ).

९६६ मञ्जुसौरभ; "यदि विषमे भवतो नजौ जरौ । सजयाः समे तु रलौ गो मञ्जुसौरभम्" ( गछ ३/१४). ९६७ मितभाषिणी, "ओजे सज्सजगा युजे सज्भसा मितभाषिणी" ( ममच २२ ). ९६८ "म्न्जनल्गा स्नैः। न्त्रभजनगाद्यैर्मानिनी" ( हे ३/१७ ); हे यती मात्र अस्वाभाविक वाटतात. ९६९ नजुल्गा भीरसा रविप्रभा ( ना २०९ ). ९७० भृगौ सौ 'अन्तर'.

९७१ 'अुत्तमवंशा'. हें वृत्त आणि त्याचें नाव हीं प्राप्टे (२/२१५) या श्लोकावरून घेतलीं आहेत. या चतुष्पदींत चरणांत तीन खटके पडून खटक्या खटक्यांनी यमकें आहेत म्हणून हिला त्रिभङ्गी म्हटलें आहे. दुसऱ्या खटक्याचें स्थान निश्चित नसल्याने तो न मानतां चतुष्पदीची अष्टपदी करून अर्धसमवृत्तच मानणें अधिक सयुक्तिक वाटतें. ९७२ शिखा (के २/३९). ९७३ खञ्जा (के २/४०). शिखा आणि खञ्जा या वृत्तरत्नाकरांत द्विपद्या आहेत; पण स्वयम्भू चतुष्पद्यांचीं अुदाहरणें देतो.

## अन्यावर्तनी अर्धसमवृत्तें

### ५२ भ्रान्तवर्ग

९७४ 'भ्रान्त' *
{ [ |– ᴗ – – | – ᴗ – – | – ᴗ – – | – ᴗ – ] "देवप्रिया"
[ |– ᴗ – – | – ᴗ – ] "कादम्बरी"

टीपा

९७४ रतमयर रतगा 'भ्रान्त'.

## भृङ्गावर्तनी अर्धसमवृत्तें

### ५३ वार-कामिनी-वर्ग

९७५ "वार"-कामिनी { [ – ᴗ – ] तडित्
[ ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – ] प्रमाणिका

९७६ वानरी { [ ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – ] प्रमाणिका
[ – ᴗ – ] तडित्

९७७ शिखी { [ – ᴗ – ] तडित्
[ ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – ] विभावरी

९७८ शिखण्डी { [ ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – | ᴗ – ᴗ – ] विभावरी
[ – ᴗ – ] तडित्

९७९ नितम्बिनी { [ – ᴗ – ] तडित्
[ चार वेळा ( ᴗ – ᴗ – ) ] 'कलिन्दनन्दिनी'

९८० सारसी { [चार वेळा (⏑ – ⏑ –)] 'कलिन्दनन्दिनी'
{ [– ⏑ –] तडित्

९८१ वारुणी { [– ⏑ –] तडित्
{ [५ वेळा (⏑ – ⏑ –)] "मृणालिनी"

९८२ अपरा { [५ वेळा (⏑ – ⏑ –)] "मृणालिनी"
{ [– ⏑ –] तडित्

९८३ वतंसिनी { [– ⏑ –] तडित्
{ [६ वेळा (⏑ – ⏑ –)] विपक्ष

९८४ सुहंसिक { [६ वेळा (⏑ – ⏑ –)] विपक्ष
{ [– ⏑ –] तडित्

९८५ "प्रदीस" { [– ⏑ – ⏑ | – ⏑ –] 'सु" कामिनी
{ [⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ –] प्रमाणिका

९८६ ययान्विता { [– ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑] "अिन्दुकान्त"
{ [⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – | S –] "धरित्री"

९८७ पद्पदावली { [⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – | ⏑ – ⏑ – | S –] "धरित्री"
{ [| – ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑ | – ⏑ – ⏑] "इन्दुकान्त"

९८८ "मोद्मयी" *
{ [⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ –] "प्रियशिष्या"
{ [⏑ ⏑ – – | ⏑ ⏑ –] अधिकारी

९८९ "रात्रिवितान"*
{ [| – – ⏑ ⏑ | – – ⏑ ⏑ | – – ⏑ ⏑ | – –] 'शुभकामी'
{ [– – ⏑ ⏑ | – –] तनुमध्या

टीपा

९७५ "चार"-कामिनी, "रो जलाः कामिनी" (हे ३/१८) ९७६ चारकामिनीव्यत्यये चानरी (हे ३/२३). ९७७ "रो भ्रजरा शिखी" (हे ३/१९). ९७८ शिखिव्यत्यये शिखण्डी (हे३/२४). ९७९ "रो ज्जरा ग्गौ नितम्बिनी" (हे ३/२०). ९८० नितम्बिनीव्यत्यये सारसी (हे ३/२५).

९८१ "रक्षि र्ज्रौ स्गा वारुणी" (हे ३/२१). ९८२ वारुणीव्यत्यये अपरा (हे ३/२६). ९८३ "रक्षतुर्ज्रौ वर्तसिनी" (हे ३/२२). ९८४ सुहंसिका, वर्तसिनी व्यत्यये हंसी (हे ३/२७). ९८५ रजा जरला 'प्रदीप्त'.

९८६ यवान्विता, "जंर्जा जरजगा यववती। छन्दोवशाच्च यवान्विता-मित्युक्तम्" (हे ३/८), परावती (ममच २२). पण पहा 'स्यादयुग्मके रजौ रलौ समेतु। जरौ जरा गुरुर्यवात् परामतीयम्' (केनिआ ७९) म्हणजे, यवात् यवशब्दांत परा मतीयवमती अित्यर्थः! ९८७ यवान्विताव्यत्यये षट्पदावली (हे ३/९). ९८८ समतयशः समगा "मोदमयी*". ९८९ तयसभगगाः स्त्यौ 'रात्रिवितान'.*

## हरावर्तनी अर्धसमवृत्ते

### ५४ कल्पना-वर्ग

९९० "कल्पना" { [।– ᴗ –।– ᴗ –।– ᴗ –।– ᴗ –] स्रग्विणी
{ [।– ᴗ –।– ᴗ –।– ᴗ –] धीरलक्ष्मी

#### टीपा

९९१ री रि: "कल्पना".

#### पुरवणी

३२ अ 'कोणोदय' [– – ᴗ –। ᴗ ᴗ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ – –]
स्भौ स्जौ गौ 'कोणोदयः' पैः.

---

अध्याय ४ था

# वृत्तविहार

ज्या वृत्तांचीं अुदाहरणें वाङ्मयांत आढळतात त्या वृत्तांचीं प्राचीन वा मी स्वतः रचून घातलेलीं अुदाहरणें या प्रकरणांत दिलीं आहेत. वृत्ताच्या नावापुढे जो अनुक्रमाङ्क आहे तो त्या वृत्ताचा मागील प्रकरणांतील अनुक्रमाङ्क समजावा. ज्या श्लोकाच्या पुढे कंसांत अनुक्रमाङ्क आहे तो श्लोक मी रचिला आहे असें समजावें.

अिन्द्रवज्रा ( ११ ) [ – – ∪ – – | ∪ ∪ – ∪ – – ]

जें अेक सत्यासच नित्य सेवी
तें चित्त लोकोत्तर होय केवीं ?
पुष्पाहुनी कोमल अन्तरङ्गीं
तें अिन्द्रवज्राहि ठरील भङ्गी. ( १ )

'आनन्दशब्द' ( १३ ) [ – – ∪ – – | ∪ ∪ ∪ ∪ – ∪ – – ]

"छन्दो गृहीत्वा हयवरभूषणानि
अुद्यान प्राप्तो नरवरपुङ्गवस्य
अुद्यानपालः प्रमुदितु वेगजातः
आनन्दशब्द प्राति भणि शाकियानाम्" ( ललि २८६ )

ललितविस्तरांतील या प्रकारच्या रचनेंत प्रथमाक्षर कोठे गुरु तर कोठे लघु आढळतें.

अिन्द्रवज्राच्या आद्याक्षराच्या ठिकाणीं दोन लघु घालून जें वृत्त स्वाभाविकपणें सिद्ध झालें त्याला कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांनी आपल्या अिन्दिरा काव्यांत अिन्दिरा हें नाव दिलें आहे. पण हें वृत्त केकिरव या नावाने छन्दोनुशासनांत आढळतें. या वृत्ताचीं अुदाहरणें अिन्दिरा काव्यांत अनेक आहेत.

केकिरव ( १४ ) [ ∪ ∪ – ∪ – – | ∪ ∪ – ∪ – – ]

पसरी पिसारा जरि मत्त केकी,
मिरवूं स्वतःला पिक ना शके की,
वचनीं पिकाच्या परि हृद्य भाव,
अुलटा परी केकिरव–प्रभाव. ( २ )

अुपेन्द्रवज्रा ( १५ ) [ ᴗ – ᴗ – – | ᴗ ᴗ – ᴗ – – ]

करी कसूनी प्रियभूमिसेवा
तयास पोटास असे नसे वा;
परी तया जो अळशी विलासी
अुपेन्द्र वज्रासन दे मिरासी. ( ३ )

अिन्द्रवज्रा आणि अुपेन्द्रवज्रा यांच्या मिश्रणास मुख्यतॆं अुपजाति म्हणतात. विरहाङ्क ( विहृ ५/२१ ) तेवढा अुपजातीस मिश्र म्हणतो. दीर्घ काव्यांत सर्गांचे सर्ग अुपजातींत रचलेले असतात. अुपजातींत अिन्द्रवज्रा–अुपेन्द्रवज्रांचे चरण किती आणि कोणत्या क्रमाने येअूं शकतील याचा विचार करून जे चौदा प्रकार ( मागे पृ. २६ .पहा ) कल्पण्यांत आले आहेत त्यांचीं अुदाहरणें मराठींत निरञ्जनमाधवाने आपल्या श्रीमहालक्ष्मीस्तोत्रांत ( निक १/६० ) दिलीं असून त्यातच त्यांचीं नावेंहि ग्रथित केलीं आहेत.

वसन्ततिलका ( २० ) [ – – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – ᴗ – – ]

आम्रांसवें वहरते ‘ मधुमाधवी ’ ती,
‘ अुद्धर्षिणी ’ श्रवणिं ये पिकभावगीती,
‘ सिंहोन्नता ’ अुपवनीं ठुमके कपोती—
कोठे वसन्ततिलका दयिता अहो ती ! ( ४ )

ऋषभ ( २१ ) [ ᴗ ᴗ – ᴗ – ᴗ ᴗ ᴗ – | ᴗ ᴗ – ᴗ – – ]

नृप नाभि होय जगतांत खरा सुदेवी,
महिषीहि धन्यच तयापरि मेरुदेवी,
सुत हो तयांस, जिन तोच विरक्तराज,
ऋषभ प्रणम्य म्हणुनीच जगास आज. ( ५ )

स्वर्णाक्षी ( २३ ) [ - - - ! ᵕ - ᵕ ᵕ ᵕ - ! ᵕ ᵕ - ᵕ - - ]

सोनेरी किती विपुल हा तव केशभार,
कान्तीचें सुवर्ण विलसे किति हें अपार!
प्रेमाची कुणी भिक तुझ्या जवळोनि याची,
—स्वर्णाक्षी! क्षुधा अजुनि का तुज सोनियाची? ( ६ )

अिन्द्रवंशा ( २६ ) [ - - ᵕ - - । ᵕ ᵕ - ᵕ - ᵕ - ]

खाणींतही दुर्मिळ रत्न सुन्दर,
होती जरी प्राप्त शुदण्ड पत्थर;
देती कसे मान तयांस सन्मती
जे अिन्द्रवंशामधि फक्त जन्मती! ( ७ )

भरत हें वृत्त देत नाही. याचीं अुदाहरणें फारच दुर्मिळ आहेत. पंदारया-प्रमाणे या वृत्तांत सर्गाचे सर्ग लिहिलेले आढळत नाहीत. ( यद्द ३०/१५, ४२/५८ ) हीं दोन अिन्द्रवंशाचीं अुदाहरणें आहेत. भागवतांत अधिक मिळ-तील. श्रीरामचन्द्रऋषिप्रणीत 'जिनस्य दृष्टान्तगर्भस्तुतिद्वात्रिंशिका' हें स्तोत्र मात्र अिन्द्रवंशावृत्तांत आहे. मराठींत वनविहार १ ला सर्ग आणि 'मजुरावर अुपासमारीची पाळी', ( केक ४२ ) ही कविता हीं अिन्द्रवंशावृत्तात आहेत.

"अश्रान्त देखूनि वनप्रिया स्वा
साहूरे कनिष्ठा वचनप्रिया स्वा
हे द्रौपदी जे सुकुमार राणी
चालोनिया कष्टलि फार रानीं" ( वाविप १/६२ )

हें अिन्द्रवंशा आणि अिन्द्रवज्रा यांच्या मिश्रणाचें अुदाहरण आहे.

वंशस्थ ( २८ ) [ ᵕ - - ᵕ - - । ᵕ ᵕ - ᵕ - ᵕ - ]

कधी म्हणूनी भजतां तया जनीं
म्हणे तुका, बोलविता दुजा धनी;
असे हरि प्रेरक शब्द-योजनीं,
क्षणैक वंशस्थ दिसे दिसो ध्वनी. ( ८ )

"अनेन दष्टो मदनाहिना हि ना
न कश्चिदात्मन्यनवस्थितः स्थितः
मुमोह वोप्योर्ध्वचलात्मनो मनो
बभूव धीमांश्च स शन्तनुस्तनुः" ( असौ १०/५६ )

हा आणि याच्या पुढील श्लोक दोन्ही, चरणान्तीं येणाऱ्या निरन्तर अक्षरावृत्तीसाठी विचारणीय आहेत.

अिन्द्रवंशा–वंशस्थ मिळून होणाऱ्या अुपजातींचीं अुदाहरणें भागवत वगळल्यास संस्कृतांत दुर्मिळच आहेत. भाक २२ हें अेकच अुदाहरण मला आढळलें. कुस १४ व्या आणि १५ व्या सर्गांत अशीं अुदाहरणें आढळतात हें ते सर्ग प्रक्षिप्त आहेत याचेंच अेक द्योतक आहे. अमरचन्द्रसूरींनें मात्र बालभारत आदिपर्व ८ वा सर्ग आणि पद्मानन्द ३ रा सर्ग हे या अुपजातींत रचिले आहेत. शिशुपालवधाचा १२ वा सर्ग आणि हरिचन्द्रकृत धर्मशर्माभ्युदयाचा ९ या सर्ग हे अिन्द्रवंशा–वंशस्थ मिळून होणाऱ्या शिशिरानामक अर्धसमवृत्तांत आहेत. वद्व ( १२/९, ४२/२४ ) हीं दोन अुदाहरणेंहि शिशिराचींच आहेत.

"अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितं
सुरक्षितं दैवहतं विनश्यति
जीवत्यनाथोऽपि वने विसर्जितः
कृतप्रयत्नोपि गृहे न जीवति" ( शाप ४४६ ).

मराठींत पुढील अुदाहरण सुप्रसिद्ध आहे.

"पितां स्तनातें क्षणमात्र राहणें,
महादरें मातृमुखासि पाहणें,
वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें,
तेणेंचि फूत्कार करूनि नाहणें". ( मोसाय ७/२ )

हा ७ वा सर्ग ( मोसम ८/४९७ ) या अुपजातींत आहे.

मञ्जुभाषिणी ( २९ ) [ ⏑ – ⏑ – – | ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

अुगीच का हें हृदय ने हरूनि ती !
अहा प्रियेची चतुरता स्मरूं किती !

दुरूनि नेत्रां दिपवि ती सुहासिनी
धरी श्रुतींही करूण मञ्जुभाषिणी. ( ९ )

" प्रतोलिकानां प्रतिदिशं बहिर्दिवि
ध्वजाः सहस्रेण लघुभिर्ध्वजैर्वृताः
बभुः पताका भुवमर्मीषु पल्लवा
विभोर्नभोमण्डपगकीर्तिवल्लिजाः " ( अप १४/९० )

भिजी १४३ वी कविता या मञ्जुभाषिणीवृत्तांत आहे.

मृदङ्गा ( ३० ) [ – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

आशाळुनीच कुणि देअिल अैकुनी धन
चाटूक्तिने निज महत्त्व गमाविती जन;
आधीच घे करुनिया मुखलेप-सोय तो
काढी मृदङ्गा मधुर ध्वनि, धन्य होय तो. ( १० )

हें वृत्त कविप्रिय होण्याजोगें आहे.

लक्ष्मी ( ३१ ) [ – – ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

लक्ष्मीमुळे अुलट खुलेच लक्ष्म तें,
लक्ष्मीविना अिहसुख सर्व भस्मतें;
लक्ष्मी करी प्रखर रणींहि नन्दन—
लक्ष्मी! तुला कवण करी न वन्दन ? ( ११ )

रुचिरा ( ३२ ) [ ⏑ – ⏑ – | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

न जीवनीं मधु रुचि अङ्गनेविणें,
रुचे कसें अरुचिर कण्ठणें जिणें;
वियत्पदाहुनि घडतां घडो च्युती,
धरी अुरीं घन रुचिरा क्षणद्युती. ( १२ )

भिजी १३९ वी कविता या रुचिरा वृत्तांत आहे. पुढील श्लोकांत रुचिरा नि
पंचरप यांचें मिश्रण आहे:—

" निहत्य तं नरपतिमिन्द्रविक्रमं
सखायमिन्द्रस्य तदेन्द्रिराहवे
ततो परांस्तव जयकाङ्क्षिणो नरान्
बभञ्ज वायुर्बलवान्द्रुमानिव " ( सभा-द्रोप २९ )

हा श्लोक अर्धसमवृत्ताप्रमाणे आहे; पुढील तसा नाही.

" ततो रथद्विपभटसादिनायकैः
करालया परिवृत आत्मसेनया
मृदङ्गभेर्यानकशङ्खगोमुखैः
प्रघोषघोषितककुभो निरक्रमत् " ( भाग १०/७१/१४ )

' कोणोदय ' ( ३२ अ ) [ – – ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – – ]

" कोणोदये भृगुतनयेऽस्तचक्रसन्धौ
वन्ध्यापतिर्यदि न सुतर्क्षमिष्टयुक्तम्
पापग्रहैर्व्ययमदलग्नराशिसंस्थैः
क्षीणे शशिन्यसुतकलत्रजन्मधीस्थे " ( ववृजा २३/४ )

रुक्मिणी ( ३३ ) [ ⏑ – – ⏑ – । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – – ]

वरील का कधि गवळ्यास राजबाळी
जरी तिच्या मनसिज अन्तरास जाळी !
परी शके अवगणु नीच रुक्मि-नीती
इहीस हो प्रिय म्हणुनीच रुक्मिणी ती. ( १३ )

" कृपाघना, मजवर सुप्रसन्न व्हावें,
अनाथ मी, सतत सहाय तू असावें;
तुझ्याविना अितरसखा नसेचि मातें,
त्वदाश्रयें सहज तरेन मी भवातें ". ( पार )

( गोकुल ४/४८ ) हा श्लोक रुक्मिणी वृत्ताचाच आहे.

"सु"–रुचिरा ( ३४ ) [ ⏑ – – – । ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – – ]

इथें भवीं रुचिर सखी शान्तवाया,
तिच्यामुळे अघन सुखे भ्रान्त वाया;

समर्थ जो अुचित पहा तोच तीज—
जगांत का न सुरुचिरा युद्धबीज ! ( १४ )

भिजी १४० वी कविता या सुरुचिरा वृत्तांत आहे.

प्रहर्षिणी ( ३५ ) [– – – | ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – –]

आकाशीं जलकण तो त्यजूनि माय
रङ्गूनी रविकरसङ्गतींत जाय;
येतां तो दुरि न करीच दुर्दिनीं ती,
वात्सल्यें अुरिंच धरी प्रहर्षिणी ती. ( १५ )

संस्कृतांत सौन्दरनन्द ( १७/७१-७३ ) हे श्लोक प्रहर्षिणीचे आहेत. मराठींत प्रहर्षणरामायण ( मोसम ७/४४३ ), वनविहार २ रा सर्ग आणि रेन्दाळकरकृत 'शुक्राची चान्दणी' ( रेक १/३०५ ) हीं प्रकरणें प्रहर्षिणी वृत्तांत आहेत.

'म्लेच्छ' ( ३६ ) [– – – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ⏑ – –]

" म्लेच्छानामथ दोष्मतामधीशितारा–
वादत्तावधिकालपालनात्तचित्तौ
वीरेन्द्रान्कथमप्यमूनिवार्य युद्धात्
भेजाते शिबिरं निजं निजं रयेण " ( नह १२/७९ )

घनमाला ( ३७ ) [⏑ ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – –]

हिणवी का कुणि तुजला म्हणून काळी !
नयनें हीं मदिर किती भरून आलीं !
अलि न शिवे कधि बघ केतकीस पोरी,
घनमाला सरस पहा कधी न गोरी. ( १६ )

भिजी १४९ वी कविता या घनमाला वृत्तांत आहे.

'मधुमक्षिका' ( ३८ ) [– ⏑ ⏑ – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – –]

कां बनतां अुगिच जगांत दीन गाअी ?
दीनसखा प्रभु न दिसे, दशा बघा ही !
तृप्त तुम्ही अजुनिहि त्या भिकेवरी कां ?
सह्य करा, मधु मधुमक्षिकेपरी खा. ( १७ )

" सृष्टिमधे असति अनेक दाखले, ते
पाहुनिया बहु मनुजा सुबुध्दि येते;
साचविती मधु मधुमक्षिका उडून
कोट्यवधिद्रुमविलसपंवरि भ्रमून." ( मिजी पृ. १०३ )

मिजी १६५ वी कविता ही रुक्मिणी वृत्तांत आहे म्हणून तेथे म्हटलें आहे तें चुकीचें आहे. ती या नवीन 'मधुमक्षिका' वृत्तांत आहे.

रमा ( ३९ ) [ ⏑⏑⏑⏑– – ! ⏑⏑⏑⏑ – ⏑ – ⏑ – – ]

त्यजुनि हरी हरं यघतां हरिप्रियेला
सुर कुठुनी कवण रसातळीं न गेला !
कनक कुठे ! तनुहि यने अखेर माती,
हरिचरणीं रमुनि ठरूं शके रमा ती. ( १८ )

" नृपति तदा नमुनि करें कुशासनातें;
कुलगुरुच्या करि बहु मान्य शासनातें;
हरिजिदरिप्रति हरिसैन्यराज राजा
मग जनक क्षितिपतिच्या म्हणे धरा जा. " ( मोकुल २/९ )

मिजी १७९ वी कविता रमावृत्तांत आहे.

" निर्मला " ( ४० ) [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ – ]

सखि, तू जशी मला
तशि या महीतला
सुख देशि कौमुदी
हिमशीत निर्मला. ( १९ )

रथोद्धता ( ४१ ) [ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ – ]

चन्द्रकोर गगनांत शोभते,
तारकागण छले समोवतें,
देवलोकमदिरामनोहरा
ही जणू प्रकटली रथोद्धता. ( २० )

प्रियंवदा (४२) [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ – ]

कशि जिवास जगतीं हवी सखी
रुचिर जी करिल संसृतीस कीं?
खचित ती विमलसौख्यसम्पदा
श्रुत न जी अवगणी प्रियंवदा. (२१)

'चित्तबोधपञ्चक' (श्लोक १९) आणि 'हलवा' (च २४) या कविता प्रियंवदा वृत्तांत आहेत.

"अभीष्ट" (४३) [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ – ]

"नरक-अद्वयपादा जो हरी
धरि तयां युवतींस तो हरी;
द्विज तयाच सुमङ्गलाष्टकीं
रमति तेच जगीं अभीष्ट कीं." (वाद्य १/१०)

"सदनिं ठेवुनि सून अेकली
प्रथम यौवनसुन्दरी भली
कलश आपण घेउनी करीं
द्विरदगामिनि जाय लौकरी." (आक्र १)

या प्रकरणांतील ३ रा श्लोकहि याच वृत्तांत आहे.

ललिता (४४) [ – – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ – ]

दारिद्र्यशोकमय हा असे भव,
प्रेमें तयांतहि मिळेच वैभव;
येवोत मेघ कितिही नभीं तरी
सौवर्ण हास्य ललिता रहीं मरी. (२२)

हम्मीर महाकाव्य १२ वा सर्ग, अमरचन्द्रसूरिप्रणीत पद्मानन्द ५ वा सर्ग, आणि अमरचन्द्रसूरिप्रणीत बालभारत, विराटपर्व, ३ रा सर्ग हे ललितावृत्तांत आहेत.

कनकप्रभा (४५) [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ – ⏑ – ]

वरवर्णिनी विधुमुखी सुवासिनी
असतां गृहांतच सुधांशुहासिनी
सुकुमार चम्पकदलापरी निकी
न पडेल कैवि कनकप्रभा फिकी ! (२३)

विक्रमोर्वशीय (४/३३, ४/४३) आणि वज्रा (२/११) हीं संस्कृतांतील कनकप्रभावृत्ताचीं प्राचीन अुदाहरणें होत. मराठींत 'त्यज सर्व योग, भज पाव, कां सया' (मोसप्र ८/४७८) हें कनकप्रभावृत्ताचें अुदाहरण आहे. वनविहार ५ वा सर्ग, रणविहार ९ वा सर्ग, आणि गृहविहार १३ वा सर्ग, हे या कनकप्रभा वृत्तांत आहेत. या वृत्ताला मञ्जुभाषिणी म्हणणें योग्य नाही.

स्वागता (४७) [ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – – ]

पद्मजेपरिस सुन्दर बाला
सिद्ध अर्थ चहुंदी करण्याला
पातलीच जर होअुनि गेहीं
स्वागता कवण धाव न घेअी ? (२४)

प्राचीन मराठी कवितेंत कविकिङ्करकृत गरुडगर्वमोचन हें प्रकरण बहुतेक स्वागता वृत्तांत आहे.

द्रुतपदा (४८) [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – – ]

जलधिजा जरि शके सुख द्याया,
परि तिचें सकल कौतुक वाया।
• स्थिरमति प्रियतमा न सदा ही,
द्रुतपदा प्रणयि-मानस दाही. (२५)

वज्र (८/५३), वज्रा (४/६, ११/१०) हीं द्रुतपदाचीं संस्कृतांतील अुदाहरणें आहेत. मराठींत सुमाद्रु (१३) हें अुदाहरण द्रुतपदाच्या निराळ्या आणि चुकीच्या लक्षणाप्रमाणे आहे. पुढील अुदाहरणांत द्रुतपदा आणि स्वागता यांचें मिश्रण आहे.

" अनुचरैः समनुवर्णितवीर्य
आदिपूरुष अिवाचलभूतिः
वनचरो गिरितटेषु चरन्ती-
र्वेणुनाह्वयति गाः स यदा हि " (भाग १०/३५/८)

चन्द्रवर्त्म (५०) [ – ⌣ – ⌣ ⌣ ⌣ – | ⌣ ⌣ ⌣ ⌣ ⌣ – ]

रूप चन्द्रमुखि, श्यामल तव हें
शुकतुल्यसुमनोगुणनिवहें
भासतें सुभग अन् रुचिर जसें
चन्द्रवर्त्म शुडुमण्डित विलसे. ( २६ ).

मणिरङ्ग (५१) [ – ⌣ – ⌣ ⌣ – | ⌣ ⌣ – – ]

वर्ण हा हिमगौर तुझा गे
सुन्दरी, खुलुं दे अनुरागें
गुञ्जवी किति तें अधरिङ्ग
बिम्बतां मधि इन्मणिरङ्ग ! ( २७ )

'लङ्का' (५२) [ ⌣ ⌣ ⌣ – ⌣ ⌣ – | ⌣ ⌣ – – ]

विभवमत्त हरी परजाया
तर वधे धरा सत्वर जाया;
जनकजा टिकली अकलङ्का,
मलिन हो गतभर्तृक लङ्का. ( २८ )

' अभीष्ट 'वृत्ताप्रमाणेंच 'लङ्का'वृत्तहि संस्कृतांत आढळत नाही. याचें नाव 'जळतसे त्रिकुटाचल लङ्का' (भीमरूपी स्तोत्रें १२/३) या श्लोकावरून घेतलें आहे. " नमन गा तुज हें भिमराया " हें रामदासी स्तोत्र 'लङ्का' वृत्तांत आहे. 'लङ्का' वृत्ताचें आणखीहि अक अुदाहरण आहे.

" हरि म्हणे गरुडा, हृदयांत
अभय होअुनि जाअिं वनांत;
वद तुं दाशरथी तुज बाहे,
वचन बोलुनिया मग पाहे. " ( अग ३८ )

" बोलतां सकृप जानकिवल्लभा
दुर्भयें गजबजे हरिची सभा
लागली किलिक ते क्षणिं कानीं
'श्रीपते, न करि हे जन-हानी.' " ( अमु ५४ )

अच्युत ( ५९ ) [ – ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ]

रङ्क हा, कुणि त्यास न मोजितें
कष्टुनी पिकवी धन जो जितें;
हो नृपालि पदच्युत मातली,
लीन अच्युत हाच रसातलीं. ( ३२ )

विद्याधर वा. भिडे यांच्या अन्योक्तिमञ्जरींतील २५ वा श्लोक या अच्युत वृत्ताचा आहे.

'जनकात्मजा' ( ६० ) [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ]

" रुदन ते करितसे जनकात्मजा,
कुमति हे अुपजली कधि आत्मजा!
तुरग बान्धुनि जिवावरि अूठला,
पडतसे जननि होअुनि व्याकुला ". ( अकुल १/१९ )

रघु ८ वा सर्ग हा या 'जनकात्मजा' वृत्तांत आहे. या वृत्ताला विभावरी म्हणणें निराधार आणि चुकीचें आहे.

द्रुतविलम्बित ( ६१ ) [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ]

खचित चञ्चल यौवनमाधुरी,
अुचित तेंद न ही, नच जा दुरी.
अुलटतां क्षण होशिल सम्मुख,
द्रुतविलम्बित गे मग तें सुख! ( ३३ )

पुढील श्लोकांत द्रुतपदा आणि द्रुतविलम्बित यांचें मिश्रण आहे.

"कपिवरा, नगरि हे नव्ह लङ्का,
सुदृढ हे भवनदींतिल नौका;
पुसशि नाम हिचें तरि द्वारका
रसिकभाविकलोक-सुतारका". ( अग १० )

कमलिनी ( ६३ ) [ ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ]

भ्रमशी खरोखर अरे भ्रमरा, कुठे ?
किति गुङ् निरर्थकच शब्द तुझा अुठे !
तपते अुन्हीं मधुरभावविशिष्ट ते
बघ मौनिनी कमलिनी जलिं तिष्ठते. ( ३४ )

मिर्जी १४५ वी कविता या कमलिनी–वृत्तांत आहे.

सुन्दर ( ६४ ) [ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ]

तुजवीण सखि, भूतल हें 'रमणीय' न,
सङ्गतिं तव नन्दन हो रमणी, वन;
भूषवी न तुजला 'मणिभूषण' हे तर
यास भूषविशि तूच खरोखर सुन्दर. ( ३५ )

शिशु ( १३/६९ ), रह ( ५/१२३ ) आणि सिद्धर्षिकृत अुपमितिभव प्रपञ्चकथामधील ( प्रस्ताव ४, पृ. ७२१ ) 'यो हि गर्वमविवेकभरेण करिष्यते' हीं सुन्दर–वृत्ताचीं अुदाहरणें आहेत.

मङ्गला ( ६५ ) [ ⏑ ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ]

कवण भूलविल अन्य तुझ्याविण अङ्गना ?
जवळ तू न तर अिन्द्रसभेंतहि रङ्ग ना !
साधित साधिल तूच मनोरथ मङ्गला,
रमणि, देअि मज गे तव सङ्गति मङ्गला. ( ३६ )

रह ( ४६/६७ ) 'त्रिदिववर्त्म घटितान्यहृष्टाहितकम्पया' हा श्लोक या मङ्गलावृत्तांत आहे.

शालिनी ( ६८ ) [ – – – – ! – ⏑ – – ⏑ – – ]

पोरां सेवी आदराने सुखाने,
पोरां पाळी कष्टुनी कौतुकाने;
शालीनत्वें आचरी प्रीति–नीती,
संसाराची श्रीच हो शालिनी ती. ( ३७ )

महाभाष्यांतील "वृद्धिश्चिण्वधुक्त्व इन्तेश्च घत्वं" ही शालिनीवृत्तांतील कारिका हें या वृत्ताचें प्राचीनतम अुदाहरण असेल. वबृजा ( २८/३ ) या

श्लोकांतील 'निर्याणं स्याद्दष्टजन्मदष्काणः' या दुसऱ्या चरणांत ऋकारयुक्त व्यञ्जनापूर्वील अक्षरास गुरुत्व आलें आहे ही गोष्ट चिन्तनीय आहे.

वातोर्मि (६९) [– – – –!⏑ ⏑ – – ⏑ – –]

देखें टेके क्षितिजीं हेमगोल,
सिन्धुपृष्ठीं लहरी नृत्यलोल;
कष्टाचा तो ज्वर सारा निमाला,
भेटे क्रीडातुर वातोर्मि–माला. (३८)

ववृ (४६/१७, ८४/६) हीं वातोर्मीचीं संस्कृतांतील अुदाहरणें आहेत.

"स्मांशकाद् ग्रहयोगेक्षणाद्वा
वर्णान्वदेद् वल्गुकादियोनौ
दृष्ट्या समानान्प्रवदेत्स्वसङ्ख्यया
रेखां वदेत्स्मरसंस्थैश्च पृष्ठे" (वबृजा ३/४)

या श्लोकांतील तिसऱ्या चरणाचा दुसरा गण जर (⏑ ⏑ – – – ⏑ – –) च्या ठिकाणीं (– ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ –) असा आहे तो नसता तर हें अेक नवीनच वृत्त झालें असतें.

वैश्वदेवी (७०) [– – – – –!– ⏑ – – – ⏑ – –]

तारुण्यद्वारीं टाकतो जों किशोर
आश्चर्यांची तों सृष्टि पाही समोर;
केवी खीत्वाची चारुता मुग्ध ठेवी!
सेवी तो अेक प्रीति ही वैश्वदेवी. (३९)

संस्कृतांत वैश्वदेवीचीं अुदाहरणें माघांत (माअ ६/५, मास्व १/९) हीं दोन आहेत. वाग्भटाच्या अष्टाङ्गहृदयांतील अुत्तरस्थानांतील (१३/९७) हा श्लोक वैश्वदेवीचाच आहे. मराठींत कुण्टेकृत राजा शिवाजी या काव्यांत सारखें भुजङ्गप्रयात वृत्त कण्टाळवाणें होअूं नये म्हणून मधून मधून वैश्वदेवीची योजना केली आहे.

चन्द्रिणी (७२) [⏑ – – – – – –!– ⏑ – – – ⏑ – –]

जरी तुझ्या शीर्षीं लोटते मेघमाला,
तरी ल्येटी मागे चन्द्र वेगें तमाला;

सुहासाचें कान्ते, तेज माझ्या घरांत
करी या जीवाची चन्द्रिणी चान्द-रात. ( ४० )

" सुवर्णप्राकारेशानदिग्भित्तिभागे
बभौ देवच्छन्दः स्वामिविश्रामहेतोः
किलोत्कण्ठापूर्णं प्राप सर्वार्थसिद्धि-
विमानं तन्मानीभूय नाभेयनाथम्" ( अप १४/४७ )

मिजी १४१ ची कविता या चन्द्रिणी-वृत्तांत आहे.

"राज"-लक्ष्मी ( ७३ ) [ – – – – ⏑ – – ! – ⏑ – – ⏑ – – ]

कष्टाळू भावडे ते राजधानींत जाती,
ऐश्वर्यें ती पहातां काय वाटे मजा ती !
स्वत्वाची विस्मृती दे लक्ष का राज-लक्ष्मी !
शोभे सारें, न कोणा मोहवी राज-लक्ष्मी ! ( ४१ )

" तत्त्वानां विस्तराद्वा तेषु सङ्क्षेपतो वा
जीवाद्यानां नयानां योऽवबोधो यथावत्
सम्यग्ज्ञानं तदेतत् तच्च पञ्चप्रकारं
ज्ञेयं मत्यादि मुक्त्यारोहसोपानरूपम्" ( अप १४/२०८ )

मन्दाक्रान्ता ( ७९ ) [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ – – ⏑ – – ]

मेघानी हें गगन भरुनी गाढ आषाढमासीं
होतां पर्युत्सुक मनिं कुणी कान्त अेकान्तवासी
तन्निःश्वास श्रवुनि रिझवी कोण त्याच्या जिवासी ?
मन्दाक्रान्ता ! सरस कविता कालिदासी विलासी. ( ४२ )

कुसुमितलता ( ८० ) [ – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – – ⏑ – – ]

वस्त्रालङ्कारीं सजुनि रमणी वाट पाही प्रियाची,
होतां शङ्कांहीं विकल मधुनी औदासाद्यांत याची;
तों ये मागूनी रमण, तिचिया स्पर्शितां पल्लवातें
होओ ती जैशी कुसुमितलता वेल्लिता मन्द वातें. ( ४३ )

> " तस्माद्भिक्षार्थे मम गुरुरितो यावदेव प्रयात-
> स्त्यक्त्वा कार्यायं गृहमहमितस्तावदेव प्रयास्ये
> पूर्ण्यं लिङ्गं हि स्खलितमनसो बिभ्रतः क्लिष्टबुद्धे-
> र्नामुष्यार्थः स्यादुपहतमतेर्नाप्ययं जीवलोकः " ( असौ ७/५२ )

मराठींत मोसम ( ८/५०८ ) हा श्लोक या कुसुमितलतावृत्तांत आहे.

विस्मिता ( ८१ ) [ ‿ – – – – – – ! ‿ ‿ ‿ ‿ ‿ – ! – ‿ – – – ‿ – – ]

> किती शोभे तुझ्या नयनतिमिरीं हृदयविद्युद्विलास !
> मिती का गे केकी कृतककलहे मेघविस्फूर्जितास !
> पुरें झालें आता ! चढुनि बघुनी अमृतदृष्टिरागें
> स्मिताची ती वृष्टी कर, नजर कां रोखिशी विस्मिता गे ! ( ४४ )

संस्कृतांत विद्धु ( २०/७९ ) आणि अप ( १४/३१ ) हीं दोन विस्मिता-वृत्ताचीं अुदाहरणें आहेत. पहिल्या अुदाहरणाच्या तिसऱ्या चरणाच्या शेवटीं विस्मिता हा शब्द आहे. मराठींत भिजी २२४ वी कविता या विस्मितावृत्तांत आहे.

चित्रमाला ( ८२ ) [ – – – – – ‿ – – ! ‿ ‿ ‿ ‿ ‿ – ! – ‿ – – – ‿ – – ]

> राहे सौन्दर्य कोठे ! मुकुलरदनीं, फुल्लधामाननीं का !
> प्रेमाचें स्थान कोठे ! मदिर नयनीं, मत्त पीन स्तनीं का !
> छे छे ! चन्द्रानना ती सकल मनिंच्या चालवी जा तमाला,
> प्रेमाची सुप्रभा ती प्रतिपदिं भवीं रङ्गवी चित्रमाला. ( ४५ )

नन्दीमुखी ( ८३ ) [ ‿ ‿ ‿ ‿ ‿ ‿ – ! – ‿ – – ‿ – – ]

> अभिरुचिच नसे ज्यांस का ! केवि सादे
> प्रियतम विज तो स्वामि हो जो विवाहें ?
> शशिमुखिविण कां हो न छन्दी सुखी तो !
> निरखुनि परि घ्या शुद्ध नन्दीमुखी तो ! ( ४६ )

> " शिशिररससरा राविविर्भर्भरार
> ददममततरा राजिजित्तत्तरार
> ससत्वसुरुरा-राममध्वध्वरार
> ततलललददरा-रासस्वत्वतरार " ( रह ५/१३५ )

चित्रलेखा ( ८४ ) [----!vvvvvvv-!-v--v--]

स्वप्नीं कोणी प्रतिरति अपुल्या ध्येयमूर्तीस पाही,
आशापूर्तीस्तव हरिखुनि ती त्यास हृत्पद्म वाही;
तों जागी हो, हळहळुनि म्हणे, 'कोण ते ! वञ्चिलें का !'
ये साह्याला प्रणयिजनपुनर्मीलनीं चित्रलेखा. ( ४७ )

पुष्पदाम ( ८५ ) [-----!vvvvvvv-!-v--v--]

होऊं ये दोघें निगडित सखये, प्रीतिच्या पुष्पपाशीं,
खेळूं कधींही प्रणयमयमनें अन्धकारीं-प्रकाशीं;
जेथे तू तेथे घर, तुजविण तो स्वर्गही दुःखधाम,
प्रार्थी मी तूतें, शिर नमवुनि घे, अर्पितों पुष्पदाम. ( ४८ )

शोभा ( ८६ ) [v-----!vvvvvv-!-v--v--]

किती वाटे चिन्ता जंव तुजवर मी प्रेम लागें कराया,
लिहूं दावूं केवी गहन भयतमीं भावनालेख राया !
तुवां येवोनी तीं भुलट विनवुनी दावितां प्रेमलोभा
कशी हृच्चन्द्रा रे, सरस पसरली पौर्णिमेचीच शोभा ! ( ४९ )

स्रग्धरा ( ८८ ) [----v--|vvvvvv-|-v--v--]

दृष्टिक्षेपें जियेने सहज मज दिली पावन प्रीतिदीक्षा,
प्राप्तीसाठी जियेच्या तपभरच जणू मीहि केली प्रतीक्षा,
साधाया अर्थ चारी शुभ घटि बघुनी शान्त त्या मध्यरातीं
सम्राज्ञी व्हावया ये मजसह हरिखें मद्गृहीं स्रग्धरा ती. ( ५० )

महास्रग्धरा (८९) [vv---v--|vvvvvv--!-v--v--]

ममता ठेवी घना, तू वरुनि दिसुनिही अन्तरङ्गीं न काळा,
निधि मोठा अमृताचा तव हृदयिं असे, कां न यावा उमाळा !
पडली सर्वसहा ही सुतविरहतपें होउनी दग्ध राही
फुलवी भेटूनि हीतें, बघ कवि खुलते रे महास्रग्धरा ही. ( ५१ )

माझे दुर्दिन या काव्याच्या अन्तीं 'करुणाब्धि माय बाळा' म्हणून जो श्लोक आहे तो ( गद्य २/२१६ ) मधील चुकीच्या लक्षणाप्रमाणे आहे. माझे

सहाध्यापक प्रो. कुन्दनगार यांनी मत्तेभविक्रीडित आणि महास्रग्धरा हीं दोन वृत्तें मिळून होणाऱ्या अर्धसमवृत्तांत रचिलेला कानडी भाषेंतील रत्नकृत गदा-युद्ध (७/४१) हा जो खिस्तशक ९८२ मधील श्लोक माझ्या दृष्टोत्पत्तीस आणला आहे त्यावरून पहातां महास्रग्धरा वृत्ताचें शुद्ध लक्षण मी वर दिलेल्या लक्षणाप्रमाणेच आहे असें दिसतें.

मालिनी (९०) [ ∪∪∪∪∪∪––|–∪––∪–– ]

रुचिर मंदिर नेत्रीं लोल नीलोत्पलें हीं,
भुजळ नितळ देहीं चम्पकाचीं दलें हीं,
मृदुल मधुर ओठीं लाल डाळिम्बफूल–
बघुनि तुज पडावी मालिनी, कां न भूल ! (५२)

चन्द्रिका (९८) [ ∪∪∪∪∪∪∪–|∪–∪––– ]

विधुसम मुख हें म्हणूं कसें वाया !
विधु वचनसुधा न देइ सेवाया.
विधु वितरिल काय ! वाञ्छता शान्ती.
सखिमुख पसरीच चन्द्रिका स्वान्तीं. (५३)

कुटिलगति (१०१) [ ∪∪∪∪∪∪∪–|–∪––∪– ]

लपत छपत जे वाकडे चालती
भुजग-गण, नसे शुद्ध त्यांना गती;
गरुड बघ कसा अमृतासी हरी,
कुटिलगति न रे भेटवी श्रीहरी. (५४)

" रघुकुलतिलका, मेदिनीपालका,
सहृदयपदका, पापपङ्कोदका,
सुहृदलिकमला, नीरदश्यामला,
अतुलभुजबळा, भ्रमरश्रीवला !" ( मोकुल ४/७४ ).

किरात (५/१८) हें कुटिलगतीचें संस्कृत उदाहरण असून मराठींत भिन्नी १३४ वी कविता या वृत्तांत आहे.

शरभललिता ( १०२ ) [ – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । – ᴗ – – ]

हासे खेळे गुटगुटित हें बाळ गोड,
पावे याच्याजवळ न करें चित्त ओढ ?
चेण्डूबाणीं स्मुनि दमवी हा दुज्यांना
दावी केवी शरभललिता हा पहा ना ! ( ५५ )

" यावत्तत्त्वं न भवति हि दृष्टं श्रुतं वा
तावच्छ्रद्धा न भवति बलस्था स्थिरा वा
दृष्टे तत्त्वे नियमपरिभूतेन्द्रियस्य
श्रद्धावृक्षो भवति सफलश्चाश्रयश्च " ( असौ १२/४३ )

असौ ( १३/५६ ) हाहि श्लोक या शरभललितावृत्ताचाच आहे.

प्रवरललिता ( १०३ ) [ ᴗ – – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – । – ᴗ – – ]

दिली तीतें आधी सहृदय किती दक्षिणा मी,
दिसूनी ये तीचा नवलपरिची वृत्ति नामी;
तिच्या औदासीन्यें हृदय अिकडे हाय चूर—
जयानन्दध्यानीं प्रवरललिता जाय दूर ! ( ५६ )

शिखरिणी ( १०४ ) [ ᴗ – – – – – ! ᴗ ᴗ ᴗ ᴗ ᴗ – – ᴗ ᴗ ᴗ – ]

जिच्या प्रीतीसाठी सरस कवनें नित्य रचिलीं,
महायत्नें रत्नें मिळवुनि सुवर्णात खचिलीं;
जिची छाया वाया धुळविच जिवा या निशिदिनी
कुठे आता कान्ता शिखरिदशना ती शिखरिणी ? ( ५७ )

" गजालिश्रेष्ठा या अतिनिबिडकान्तारजठरीं
मदान्धाक्षा मित्रा, क्षणभरहि वास्तव्य न करीं.
नखाग्रांनी येथे गुरुतरशिला भेदुनि करि—
भ्रमाने, आहे रे गिरिकुहरिं हा निद्रित हरी " ( खाप्राक २६ )

असा ( १४/५० ) हे शिखरिणीचें अेक प्राचीनतम अुदाहरण आहे.

पुट (१०६) [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ! – ⏑ – – ]

वरवर वघशी तो मृत्तिका ही,
श्रम कर तरुणा, निवृत्ति कां ही ?
चल खण कुदळीने, झाण यत्नें,
कर–पुट भरुनी दे खाण रत्नें. (५८)

"कनक"–गौरी (१०७) [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ – – ]

जुळुनि कर पडे का हृदययोग ?
प्रणयहि म्हणवे का निबळ रोग ?
यच हरि किति काळा, शुद्धानि गौरी
घनलिच कशि राधा कनकगौरी. (५९)

क्षमा (१०९) [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – – ! ⏑ – ⏑ – – ]

किति जरि कुणि केले प्रहार, साही
करि सतत तपस्या पहा रवा ही.
प्रभु अवतरतो या क्षमा–प्रभावें,
जन द्विज म्हणतात क्षमा स्वभावें. (६०)

मिजी १३५ वी कविता या क्षमावृत्तांत आहे.

लय (१११) [ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ – ]

मधुर अधरीं तुझ्या मिळता सुधा
कुठुनि दुसरी अुरेल अता क्षुधा ?
मदिरनयने, नकोच सुरालय,
प्रणयिं तुझिया घडोच पुरा लय. (६१)

भाराक्रान्ता (११२) [ – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! ⏑ – ⏑ ⏑ – ⏑ ]

श्रीरामाच्या सरल चरितीं प्रमाद न सापडे,
सम्मोहीं तो नरमणि पुढे कसा मनसा पडे !
'हा हा सीते !' वचनिं, हृदयीं वसे तंव नित्य जी
भाराक्रान्ता असुनि तिज तो कसा विपिनीं त्यजी ! (६२)

कुरङ्गिका ( ११४ ) [------!ᴗᴗᴗᴗᴗ-!ᴗ-ᴗᴗ-ᴗ-]

गाण्याने तुझ्या अुचित गमतें मुकेपण ये पिका,
कान्तीने तुझ्या असुनि गहिंरा गुलाब पडे फिका,
स्वारस्यें तुझ्या भ्रमर झुलवां रहे न सुरङ्गि कां!
पाहूनी तुझीं रुचिर नयनें दडेच कुरङ्गिका. ( ६३ )

मकरन्दिका ( ११५ ) [ᴗ------|ᴗᴗᴗᴗᴗ-!ᴗ-ᴗᴗ-ᴗ-

शिरीषवृक्षातें कुसुमभर ये, पलाशहि रङ्गतो,
न गे ह्या आम्राचा परिमल परी प्रमत्त अनङ्ग तो!
सुयोगाची आता विरहिहृदया विलम्बित सन्धि कां!
किती सुर्शी आर्तस्वर मधुर ही करी मकरन्दिका! ( ६४ )

अपराजिता ( ११६ ) [ᴗᴗᴗᴗᴗᴗ-!ᴗ-ᴗᴗ-ᴗ-]

तरुण अकरुणे, अिथे लवले किती,
झुडविलि हृदयें तुवां अवले, किती!
प्रगटवि महिला-स्वभाव खरा जिता,
रडतच असती स्त्रिया अपराजिता. ( ६५ )

चल ( ११७ ) [-----|ᴗᴗᴗᴗᴗᴗ-!ᴗ-ᴗᴗ-ᴗ-]

कान्तीहूनी प्रबलतर वसें प्रतिष्ठित काञ्चन!
त्याच्यामागे कुणि धडपडतो न त्यामधि लाञ्छन!
आसक्ती ही कधि न अुपशमे, अखण्ड करी छल,
त्याच्यासाठीं अचल जनरति, स्वतःच जरी चल! ( ६६ )

भुजङ्गविजृम्भित (१२१) [विद्युन्माला!८ल|ᴗᴗ-|ᴗ-ᴗᴗ-ᴗ-]

“ लक्ष्मीच्या अुन्मादें दीना सतत तुडवि अकरुण तो
पडे नरकामधी,
दुर्दैवाने गेली लक्ष्मी तर अनुभवि नर नरका
अिथे मरणावधी;
दारोदारीं भिक्षेसाठी भ्रमण करिल सहुनि अहो
तिरस्कृति दुस्सहा,

लक्ष्मीपुत्रांनो, अुन्मादा त्यजुनि अुपकृति करित जा
अनाथ जनीं सदा" (मिजी २९१ वी)

भुजङ्गविजृम्भित हें वृत्त भरतपिङ्गलांनी सांगितलें असून प्राचीन वाङ्मयांत याचीं अुदाहरणें सांपडत नाहीत. शूद्रककृत पद्मप्राभृतकांत दोन आणि वररुचिकृत अुभयाभिसारिकामध्ये अेक अशीं तीनच अुदाहरणें मला सांपडलीं.

हरिणी (१३४) [ ∪ ∪ ∪ ∪ ∪ –|– – – –|∪ – ∪ ∪ – ∪ – ]

सचित दुबळें होणें मोठें असे जगिं पातक,
प्रभुहि दुबळ्यांचा देखा हा सदेवर घातक;
नाहि सुगमता दौर्बल्यीं या, छळूं अुणि ही शके,
तरि हरिकटी, कां व्हावें तू मनें हरिणी सखे! (६७)

'विरह' (टिक ९६) ही कविता हरिणी वृत्तांत आहे.

'जननीमुद' (१३५) [ ∪ ∪ ∪ ∪ ∪ ∪ –|– – ∪ ∪ –|∪ – ∪ ∪ – ∪ – ]

"बहुतरमनूद्यावारयता मुखैरखिलश्रुती–
र्नलिनजनुषा निर्मातुमहो यदस्य न शक्यते
कथमिह तव स्तोत्रे कवयः शक्ता (!) स्वयमिन्दिरे
जगति शिशवः शक्याऽयं कृतोऽय वा जननीमुदे" (वेलस १५/१७)

हारिणी (१३९) [ – – – –|∪ ∪ ∪ ∪ –|– – ∪ – – ∪ – ]

दृष्टिक्षेपें मृत जरि करी, सञ्जीवनी तन्मुखीं,
अुच्चारीना जरि मधुवचें, चर्या सदा कौतुकी;
प्रेमामाजीं बुडवुनि पहा होओी मवीं तारिणी,
सेवाधर्मे बनुनि महिषी चित्तास हो हारिणी. (६८)

छाया (१४१) [ ∪ – – – – – –|∪ ∪ ∪ ∪ ∪ –|– – ∪ – – – ]

सदा जीवातें या प्रिय सुखद जी ग्रीष्मांत छाया जशी,
मुखच्छाया जीची बघुनि गगनीं घे पाण्डुतेला शशी;
विनम्रा छाया जी जणु पद धरी, माजे न सत्तामदें,
मिळे ती या वर्षी सहजच जशी छाया प्रकाशामधें. (६९)

केसर ( १४३ ) [----!vvvvvv-!--v--v-]

पुष्पामाजी दिसति कुठकुठे रङ्गाकृती मात्र तीं,
कोठे गन्ध प्रखर अरुचिर, प्रेमास ना पात्र तीं;
जातां कोमेजुनि कुणि न बघे निर्वारि जैसें सर,
नासाग्रीं जें धरिति जरि सुकें तें अेकलें केसर. ( ७० )

वञ्चिता ( १४४ ) [-----!vvvvvvv-!--v---v-]

नाथा, अर्धाङ्गी घनतमविपिनीं अर्ध्याच वस्त्रानिशीं
टाकोनी गेलां अवचित भुदुनी कोठे कशाला निशीं !
निन्दावें आतां खडतर अपुल्या माझ्याच मी सञ्चिता—
दुर्दैवें राजन्, चुकुनिहि मजला कां हो असे वञ्चितां ! ( ७१ )

रोहिणी ( १४६ ) [v v v-!----!--v-- -]

जरि न कविता ये तर्कांच्या व्याख्येमधे कोण्डितां
तरि निसटशी हातांतूनी, पाशीं जवे ओढितां;
मग छुलचिशी कां गे अैशी घालुनि तू मोहिनी !
प्रिय अशि कशी होशी कान्ते, चन्द्रा जशी रोहिणी ! ( ७२ )

ज्योत्स्ना ( १४७ ) [------v--!---v----v-]

जीच्या सौम्य प्रभावें भावाम्बुधी नाचतो,
क्रीडामत्त प्रमायी होअी न केव्हांच तो;
स्वप्नसृष्टीवरी ये जीच्या वचें मोहर,
अैशी माझी सखी ती ज्योत्स्नाच चेतोहर. ( ७३ )

"सिद्धान्तोक्तेषु शुद्धा तत्त्वेषु यद्वासना
सम्यक् सम्यक् तमेतच्छङ्कादिदोषोज्झितम्
जायेतैतन्निसर्गात्संसर्गतो वा गुरोः
संसारस्वररूपाकूपारपारप्रदम्" ( अप १४/२०९ )

शार्दूलविक्रीडित (१५१) [---vv-v-vvv-!--v--v-

शाहाच्या पुढती लवे न, न लगे याला जहागीर हा !
रघापाया वघतो स्वराज्य !— चल जा वेड्या ! अभागी रहा !

नात्याचें म्हणती, कुलाधम पहा आम्हां करी क्रीडित—
शार्दूलासच कौतुकास्पद गमे शार्दूलविक्रीडित. (७४)

अशी (११/६०) हें शार्दूलविक्रीडिताचें अेक प्राचीनतम अुदाहरण दिसतें.

मत्तेभविक्रीडित (१५३)

[ ⏑ ⏑ – – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – | – – ⏑ – – ⏑ – ]

जन येती चढुनी तटावर किती देखावया कौतुक,
दिसती काय तरी प्रफुल्ल अितक्या दाटींत अत्युत्सुक !
परि होती किति आगळांत हृदयें नावेक सम्मीलित
जंव हो यादिसवें भयङ्कर असें मत्तेभविक्रीडित. (७५)

संस्कृतांत अैहोळेशिलालेखांतील 'वरदातुङ्गतरङ्गरङ्गविलसद्हंसावली-मेखलां' हा अेक श्लोक आणि वेलम (१५/१३, १५/१५) हे दोन श्लोक मत्तेभविक्रीडिताचे आढळले. मराठींत मिर्जी २२८ यी कविता ही मत्तेभविक्रीडितांत आहे.

शार्दूलविक्रीडिताच्या रचनेंत मध्येच अनवधानाने अेखादा चरण मत्तेभविक्रीडिताचा येतो:—

(१) "रथाध्या चासनमस्य चाह नृपतिर्गच्छ प्रवेशं दद
अथितः सारथिवाक्य भुत्समुदितः प्रोत्या सुखेनान्वितः"
(लवि पृ. १२५)

(२) "पहिल्याने नृप काय वाक्य वदला ! हेही कथा अुत्तरा
देअूनी नृप तोषला, वद भला त्या सर्वही विस्तरा"
(चावि २/६).

मदनललिता (१५७) [ – – – – | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | – – ⏑ ⏑ ⏑ – ]

शब्दांना का जुळवुनि लयीं ये त्यांत कविता ?
पार्ही स्वात्तीं दुरुनि ठिणगी का दिव्य सविता ?
का ये लक्ष्मी हृदयमथनीं जी कश्मल हरी !
का ही आहे मदनललिता आनन्दलहरी ? (७६)

क्रीडा ( १५८ ) [ ⏑ – – – – – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ ⏑ – ]

सुधारदीने ती मज भुलवुनी नेअूनि विपिनीं
कितीक स्वान्तींचीं करुण गुपितें साङ्गे मधुदिनीं,
दरीमाजी लोटी चढवुनि सुखमोत्तुङ्गशिखरीं–
अहा ती चार्वङ्गी अदय दयिता क्रीडा करि करी ! ( ७७ )

सुमधुरा ( १५९ ) [ – – – – ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ ⏑ – ]

देवी केवी रुचावा तुजविण असा हा लौकिक मला !
ठावा साऱ्या सुखाचा अनुपमच गे त्वत्सङ्ग गमला.
चिन्ता वाटे गृहींची जवळ असतां तू की सुम–धुरा,
कायावाचामनाच्या सुमधुरगुणें होशी सुमधुरा. ( ७८ )

भिजी २१८ वी अेकश्लोकी कविता ही सुमधुरावृत्तांत आहे.

सुवदना ( १६० ) [ – – – – ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ ⏑ – ]

सारी जीचा मुखेन्दू सकल तिमिर अन् सन्तापहि दुरी,
दाटे स्निग्ध प्रसन्न प्रणय अुसळवी गम्भीरहि अुरीं,
आणी आकर्षुनी जी विबुधगुणबळें स्वर्गे स्वसदना,
संसारीं या असावी चतुर नरसखी अैशी सुवदना. ( ७९ )

संस्कृतांत आरम्भीं आरम्भीं ( असो ११/६२,१८/६४, भास ३/७,११ ) सुवदनावृत्ताचीं अुदाहरणें पुष्कळ आढळतात; अुत्तरोत्तर तीं दुर्मिळ होत जातात.

सुरसा ( १६१ ) [ – – – – ⏑ – – ! ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ! – ⏑ ⏑ ⏑ – ]

वाहे खड्गें जयाच्या नररुधिरनदी हिंस्रक रणीं,
राहे स्वाधीन त्याच्या गणुनि सकल ती स्तुत्य करणी !
काळें लाभो न लाभो त्रिदिव खचित त्या जो असुरसा,
भाळे त्याच्या प्रतापा क्षिति शिव शिव ! ही काय सुरसा ! ( ८० )

भिजी २१९ वी कविता या सुरसावृत्तांत आहे.

शार्दूलललित ( १६२ ) [ – – – ⏑ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ⏑ – ! – – ⏑ ⏑ – ]

सौन्दर्यासह हिंसता अशि कधी अेकत्रचि वसे !
पाचूचा रमणीय रङ्ग गरळीं नाचूनि विलसे.

"अञ्जन नयनीं
ज्यासम रचुनी
भ्रूयुगधनुपें
याऊनि रवसें" (मका)

'सौरीतटचर' (१८८) [।—–⏑⏑⏑⏑]

"सौरीतटचर
गौरीवत्सपर–
गौरीपटहर
चौरीकृतकर" (रुस्तमा १६४)

"स त्वं जयजय
दुष्टप्रतिभय
भक्तस्थिरदय
हृतव्रजभय" (रुस्तमा १६१)

शुद्धमध्या (१८९) [⏑⏑——⏑⏑]

"धृतगोवर्धन
सुरभीवर्धन
पशुपालप्रिय
रचितोपक्रिय" (रुस्तमा ११८)

"सलिलनीडुम्बक
मुरलीचुम्बक
जननीवन्दक
पशुपीनन्दक" (रुस्तमा १२०)

'सौरभसज्जित' (१९०) [।–⏑⏑–⏑⏑]

"माधव विस्फुर
दानवनिष्ठुर
यौवतरञ्जित
सौरभसज्जित" (रुस्तमा १५०)

" कुङ्कुमपुण्ड्रक
गुम्फितपुण्ड्रक
सङ्कुलकङ्कण
कण्ठगरङ्गण " ( रूस्तमा १३० )

द्रुतगति ( १९१ ) [ । ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]

अनुदिन झगडा
करिं घन पकडा;
निसटुनि परि तें
द्रुतगति चरितें. ( ८८ )

भिजी १५ वी कविता या द्रुतगतिवृत्तांत आहे.

'करुणापरिमल' ( १९२ ) [ । ⏑ ⏑ – ⏑ ⏑ ⏑ ⏑ ]

" वरुणालयसम–
करुणापरिमल
कलभायितबल–
शलभायितखल " ( रूस्तमा १२६ )

" प्रकटीकृतगुण " ( रूस्तमा १२६ ) या पद्यांत या लगावलीच्या ६ चतुष्पद्या आहेत.

'प्रपन्ननन्दन' ( १९७ ) [ ⏑ – ⏑ – ⏑ ⏑ ]

" अरिष्टखण्डन
स्वभक्तमण्डन
प्रयुक्तचन्दन
प्रपन्ननन्दन " ( रूस्तमा १२० )

तनुमध्या ( २०७ ) [ । – – ⏑ ⏑ – । – ]

स्फूर्ती हृदयाला
देई मधुबाला
शोभे मग पद्या–
माजी तनुमध्या. ( ८९ )

या प्रकरणांत राजरमणीयाच्या ६ चतुष्पद्या आहेत.

प्रीति ( २२६ ) [ |–ऽ⏑––|– ]

बन्ध पैक्याचा,
तन्तु ऐक्याचा;
ज्यात न थी ती
त्या कुठे प्रीती ! ( ९२ )

भिजी ४ थी कविता प्रीतिवृत्तांत आहे.

पद्मिनी ( २३९ ) [ प्रीतिद्विपवृत्ता ]

गीतवाद्यांची आवडी मोठी,
हृद्य शब्दांची माधुरी ओठीं,
चारवेषा ये लावया वारें,
पद्मगन्धा ती पद्मिनी वा रे ! ( ९३ )

भिजी ३८ वी कविता या पद्मिनीवृत्तांत आहे.

मदलेखा ( २६१ ) [ |–––⏑⏑|–– ]

आला माज गजाला,
हा अुच्छृङ्खल झाला;
हें गण्डस्थल देखा
या काळ्या मदलेखा. ( ९४ )

" वृष्णी फार दयारे
सरा ये अति प्यारे
वीरां अन्त न लेखा,
छन्दीं हे मदलेखा. " ( ओलख ३/६ )

" देवा दीन–दयाळा
तारीं वा मज बाळा,
तोडीं या भवजाळा
जो तू दण्डिशि काळा " ( पार )

'तृष्णा' ( २७३ ) [ I – ‿ ‿ ‿ – I – ‿ ‿ ]

" तृष्णां त्यज धर्मे भज
पापे हृदयं मा कुरु
भिक्षा यदि लक्ष्मीरवर
शिष्टानिति संभज " ( वि ५४ टीका )

'सञ्चल' ( २७४ ) [ I – ‿ ‿ ‿ ‿ ‿ ‿ I – ‿ ‿ ]

" सञ्चलविचकिलकुण्डल
मण्डितवरतनुमण्डल
कुण्डलिपतिकृतखङ्गर
खण्डितमुपनमयङ्कर " ( रूस्तमा १२४ )

" अम्बुजकिरणविडम्बक
सज्जनपरिचलदम्बक
चुम्बितयुवतिकदम्बक
कुन्तलकुसुमितकदम्बक " ( रूस्तमा १३८ )

अलोला ( २७५ ) [ मदलेखाद्विरावृत्ता ]

" भ्रूलेखां किमपलां त्वं निर्मासि कराली
किं वा पश्यसि वामं संरम्भादभिरामम्
दिष्ट्या काननलोला हेलोत्फुल्लकपोला
वृत्ता त्वं हरिहस्ते भ्रातान्यो भुवि कस्ते " ( रूस्तमा २५० )

याच्या नन्तरचा श्लोकहि अलोलावृत्ताचाच आहे.

श्लोकांत मध्यान्त्य यमक असल्याने चतुष्पदीची अष्टपदी करून वृत्त मदलेखाच मानण्याकडे प्रवृत्ति होते. मिजी १६१ वी कविता ही अलोलावृत्तांत आहे.

मेघवितान ( २७८ ) [ ‿ ‿ I – ‿ ‿ ‿ – ‿ ‿ I – – ]

जरि दुर्दिन येजि घरांत
तरि सुप्रभ तू दिनरात;

रचनेचेच हा भोग
प्रिय होती न सुद्योग " (भिजी)

ही भिजी २८ वी कविता सरलावृत्तांत नव्हे तर या कलहवृत्तांत आहे.

"सद्"-वृत्ता (२९३) [ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ | – – – ]

स्तुति जरि किति कवि मत्याची
करिति तरि न बुध तें याची;
रुचिर चतकि करि तें वृत्ता,
अुचित न लव परि "सद्"-वृत्ता. (१०२)

भिजी ८९ वी कविता यदल्लावृत्तांत नव्हे तर या सद्वृत्तावृत्तांत आहे.

"अभिरामा" (२९४) [ | – – ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – – ]

कां पाण्डुर तूं शशिराया !
ही प्रीति पहा करि वाया !
माझी न कुणी नभि रामा—
अन् दूर सदा अभिरामा. (१०३)

मणिबन्ध (२९६) [ | – ⏑ ⏑ – – | – ⏑ ⏑ – ]

चाटुवचांनी कां झुकतां ?
स्वत्वमहत्त्वा कां मुकतां ?
होय कसें लोकीं न हसें !
की मणिबन्ध क्षीण असे. (१०४)

भिजी २६ वी नि २७ वी या कविता मणिबन्धवृत्तांत आहेत.

कनक (२९७) [ | – – – ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ]

कान्तेची रति हाय सुरीं,
तारुण्यासह जाय दुरी;
आसक्ती परी भीषण की
जी आ–जीव वसे कनकीं ! (१०५)

"नाना वाजति वाद्यध्वनी.
घोषें कापतसे अवनी
भूपा लागुनि जोर महा
दक्षा छन्द मनोरम हा." ( ओलस्व ४/७ )

दक्षा या नावाला कोठें आधार सापडत नाही.

**चित्रगति** ( २९८ ) [ । – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ । – ᴗ ᴗ – ]

हीन गुणें नर त्याजकडे
जाय तरी गुणिराज पडे;
देखुनि त्यास दरिद्र-मती
व्यक्त करी निज चित्र गती. ( १०६ )

"सद्घन चिद्घन नायक जो
संसृतिसागरतारक वा
तद्गुणकीर्तनिं गायक जो
तोचि जना शिव-कारक वा." ( डिवस्व २/९३ )

"**सुलोचना**" ( ३०७ ) [ । – – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

रूपावर भाळुनी कुणी
नेऊं रमणीस जिद्दकुनी;
तें प्रेम खुळें खुळेंच ना,
दासी तरि घ्या सुलोचना. ( १०७ )

'**चारुलोचना**' ( ३०८ ) [ । ᴗ ᴗ – ᴗ ᴗ – । ᴗ – ᴗ – ]

"अयि मन्मथचूतमञ्जरि
श्रवणायतचारुलोचने
अपहृत्य मनः क यासि मे
किमराजकमत्र राजते" ( काव्य १९ )

"स्मरति स्म रतिप्रियायतः
क्षणमीक्षणमीलितं रतम्

परमाप रमाम्र ततम–
स्वरसास्वरसा वियोगिनी " ( हयद्य १०/४५ )

प्रसभ ( ३०९ ) [ । ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ ᵕ – । ᵕ – ᵕ – ]

चिररुचिर दिसे रवी परी,
नहि हृदयगुणें शशी परी,
अुघड न पण तें अरित्व रे–
प्रसभ जनमनें हरी त्वरें. ( १०८ )

संस्कृतांत रघु ( ५/१२९ ) हें प्रसभवृत्ताचें अुदाहरण आहे.

'नृपात्मजा' ( ३१० ) [ । ᵕ – ᵕ – – । ᵕ – ᵕ – ]

" अजात्मजें दिसर्थे सुखें
विलोकिली सत्सुधामुखें;
स्वपुत्रयोग्या विलासिनी
नृपात्मजा चारुहासिनी." ( मोसम ८/५१६ ).

३ र्‍या आणि ४ थ्या चरणांची मी येथे आलटापालट केली आहे.

'कटाक्षललिता' ( ३११ ) [ । ᵕ – ᵕ ᵕ ᵕ – । ᵕ – ᵕ – ]

" मनाक्प्रसृतदन्तदीधितिः
स्मरोल्लसितगण्डमण्डला
कटाक्षललिता तु कामिनी
मनो हरति चारुहासिनी " ( पि ४४ टीका )

जगांत गुणलुब्ध सुन्दरी
दुराप दिसते खरोखरी;
धनास वरिती क्षितीवरी
कटाक्षललिता किती तरी ! ( १०९ )

मनोरमा ( ३१२ ) [ । ᵕ ᵕ ᵕ – ᵕ – । ᵕ – ᵕ – ]

प्रणयवाहिनी स्वतन्त्र जी
अधम दास्यभावना त्यजी

हृदयवैभवें तिलोत्तमा
कवण तीहुनी मनोरमा ? ( ११० )

'पिच्छ' ( ३१३ ) [ | – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ – ᴗ ]

" पिच्छलसदननीलकेश
चन्दनचर्चितचारुवेश
खण्डितदुर्जनभूरिमाय "
मण्डितनिर्मलहारिकाय " ( रूस्तमा १५८ )

मोटक ( ३१९ ) [ – | – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ ᴗ – ]

वाहे नव जीवन हें पन्हळीं,
जुलुङ्क पहा झुडुपें सगळीं;
हे बैल कसे रिझती कवनें,
कां मोट फण्हे असहायपणें ? ( १११ )

" भानोरुदये यदि वास्तमये
गन्धर्वपुरप्रतिमा ध्वजिनी
विम्बं निरुणद्धि तदा नृपतेः
मार्त समरं सभयं प्रवदेत् " ( वबृ ४६/२६ )

तोटक ( ३२० ) [ ᴗ ᴗ | – ᴗ ᴗ – ᴗ ᴗ | – ᴗ ᴗ – ]

पडतां कधि गाठ न शब्द वदे,
मग घाडुनि भेट कशास्तव दे ?
सखि, शान्त विरक्त दिसो मुनि तो,
बसतो टक लावुनि चोरुनि तो. ( ११२ )

" यदि जन्मजरामरणं न भवेत्
यदि चेष्टवियोगभयं न भवेत्
यदि सर्वमनित्यमिदं न भवेत्
अिहजन्मनि कस्य रतिर्नभवेत् " ( सुभावि ३३१४ )

हें वृत्त फार प्राचीन आहे. महाभाष्य खण्ड १ ( पृ. ३३४ ) मधील 'दुहि याचि रुधि' ही कारिका तोटकवृत्तांत आहे. मराठींत मोरोपन्तकृत हररमणीय रामायण ( मोसभ ७/३९० ) हें तोटकवृत्तांत आहे.

विदुषी ( ३२८ ) [ ⏑ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ ⏑ | – ऽ ⏑ – ]

गुणसुन्दर जी महिला तिचा
सहवास बरा सुखशान्तिचा;
मतिमन्द सुधांशुमुखीहुनी
विदुषीच बरी महिली गुणी. ( ११३ )

" सुरभूषण राम रणाङ्गणीं
रणकर्कश देवशिरोमणी;
रिपुकाळ कराल विदारि तो
रणशूर रणीं मदहारि तो." ( राकधास ७ )

मौक्तिकदाम ( ३२९ ) [ ⏑ | – ⏑ ⏑ – ⏑ – | – ⏑ ⏑ – – ⏑ ]

किती जप सिन्धु भयङ्कर खोल
नि त्यांतच मौक्तिक तें बहुमोल;
मिळे परि पाणबुड्यास उदाम,
नि घालि गळां नृप मौक्तिकदाम. ( ११४ )

पुणा ( ९/१६ ) हें कडवंच या मौक्तिकदामवृत्तांत आहे. मोत्ताय ९ वा सर्ग मौक्तिकदामवृत्तांत आहे. रामदासांचेंहि अेक अुदाहरण आहे:—

" किती रडतील, किती पडतील,
किती दडतील, किती घडतील,
नको बहु चार, त्यजी अविचार,
करुनि विचार पहा निजसार. " ( राकधास १४९ )

'तेजस्पति' ( ३३० ) [ | – – – – | – – ⏑ – ]

" ये ये सारीं दूरी तमा,
ये तेजोमूला सुत्तमा
पर्जीच्या या मेघाप्रती
निःसारीं हे तेजस्पती. ( अुष ३२८ )

या कवितेतील सारीं कडवीं या 'तेजस्पति' वृत्तांत आहेत.

अुज्ज्वला ( ३३३ ) [ | ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – | ⏑ ⏑ – ⏑ – ]

जंव नव युवका युवती दिसे
तंव रुचिर यमे जडुनी पिसें,
सदय हिमकराहुनि शीतला
सुतपित कनकाहुनि अुज्ज्वला. ( ११५ )

"चरणयुगुळ सुन्दर गोजिरे
मृदु कुवलय रङ्गित साजिरे
शरधि कुमरि वाञ्छिति अन्तरें
मुनिजन हृदिं चिन्तिति आदरें. ( डिरस्व २/१३० )

हंसी ( ३३४ ) [ | – – – – ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ ⏑ – ]

साधी साधी रुचिर महिला,
शृङ्गाराची निकड न दिला,
शब्द प्रेमें स्थिरमति वदे
दावी हंसीपरि गति पदें. ( ११६ )

"सेवा सेवा प्रभुपद सदा,
त्याच्या नामा निशिदिनिं वदा,
जा हो जा हो शरण सदया,
तो विश्वात्मा निरशिल भया ". ( पार )

संस्कृतांत ममच ( १/३१ ) आणि मराठींत 'पर्णागारी०' हा श्लोक मोसम (८/६३५) हीं आणखी हंसीवृत्ताचीं अुदाहरणें आहेत.

विद्युन्माला ( ३३५ ) [ | – – – – | – – – – ]

मेघाली का ही आभाळीं
मृत्युच्छाया आली काळी
का हा श्याम स्वच्छ आला
कण्ठीं ज्याच्या विद्युन्माला ? ( ११७ )

महाभाष्यांत दोनदा ( १/ ३५६, २/२०४ ) कारिकेसाठी विद्युन्मालावृत्त योजिलेलें दिसतें. ववृ (६८/२७) हें आणखी अेक अुदाहरण आहे. मराठींत मोरोपन्तकृत रामायणकथासुधा ( मोसग्र ८/२८ ) हें काव्य विद्युन्माला-वृत्तांत आहे.

स्निग्धा ( ३३६ ) [ । – ‿ ‿ – – । – – – – ]

> अन्त्यज पोरा लावी पोटीं
> माणुसकी ती त्याची मोटी;
> जात्यभिमानें कैची दिग्धा
> भूतदयेने वृत्ति स्निग्धा ! ( ११८ )

> "घालित सेवीं माला कण्ठीं
> किधर देहा जाली सृष्टी
> ब्राम्हणरूपें देवा भेटी
> येअुनि मागे ज्ञानापाठीं." ( डिरस्व ६/१४ )

संस्कृतांत स्निग्धावृत्ताचीं ववृ ( ६८/१२ ) आणि ववृजा ( ११/९ ), ममच ( १/२५ ) हीं तीन अुदाहरणें आढळतात.

बिन्दु ( ३३७ ) [ । – ‿ ‿ – ‿ ‿ । – – – – ]

> "रुक्मिणि सुन्दरि खेळे जेथे
> तें वन मङ्गळ राहे तेथे
> ध्यान करी पर दास्त्र (!) युक्तें
> श्रीहरिपङ्कज चित्तीं चित्तें." ( डिरस्व २/६० )

> "हासत हासत बोले औसें
> भाग्य पळागत तूझें कैसें
> वृद्धपणीं तुज पुत्रभेटी
> सौख्य महा मज दाटे पोटीं". ( डिरस्व )

प्राकृतपैङ्गलांतील प्लवङ्गम नामक मात्रावृत्ताचा अन्तर्भाव या वर्गजातींत होतो.

२८ 'सुस्वर' [।प।--+ऽऽ।--+]

"उगवुनि आला पुनवेचा -० चान्दोबा
सुस्वर गर्जे यमुनेचा -० धवधऽवा
धवलित झालीं वाळूचीं -० मैदानें
सारविलीं जणु शाङ्ख्या -० रङ्गानें
शीतळ वारा वाहे हा -० झुळुझुळू
डुललीं रानें आनन्दें -० हळूहळू". (काविता-वाग्धेप ९३)

२९ 'कृतिमण्डित' [।प।+ऽ०+,+।+ऽ०+]

"हस धराया लाऽगली हे भाऽगली ध्रु०
मृदुल तनू कोमेऽजली घामेऽजली १
चाली करुनि न साऽवलींत विसाऽवली २
स्तविली रघुपतिपऽण्डितें कृतिमऽण्डितें." ३ (दस्व १०६)

३० 'स्वैरगति' [।--+ऽऽ।प।--+]

"फुलुनि फुलें -० त्यायोगें उपवन खुललें.
दरवळला -० परिमल सुखवाया सकला.
स्वैरगती -० अलिगण उडती वागडती.
मधुनादें -० गाती प्रभुगुण आनन्दें" (विक ९९)

माधवानुजकृत 'विसरलेलें गाणें' (मानुक १४४), गोविन्दाग्रजकृत कळ्यांचीं फुलें कशीं झालीं?' (गोवा १५५), बालकविकृत 'फुलपाखरू-लवेली' (बाक ३), आणि 'पाऊस' (बाक ६) या कविता य वैरगतिजातींत आहेत.

३१ "गोपालन" [--।--+ऽऽ।प।-+]

"धुन्ना धमाल ते -० धमाल अपुल्या गाओ
आम्ही दातो ते -० पयास दातो माओ
नेपे धापाता -० अमुता भेलाद नाओ
नदी घरगत ते -० घरगत कलली माओ." (नाम-पत्र २/५२

हें मधुर, घोवडें, दीर्घ पद्य सवन्ध या गोपालनजातींतच आहे.

३२ 'भूपति' [-।प।प।-+]

या जातीला नाव 'भूपती खरे तें वैभवसुख सेवोती' (देमृ २९) देवलांच्या पद्यावरून पडलें असलें तरी ही जाति प्राचीनच आहे. गोविन्दाग्रजकृत पुढील पद्य पहा.

(१) "किती अन्त पाहशिल माझा रे गुणवन्ता !
तुजविण पळ युग समजतों पण्ढरीनाथा." (पस २/३२९ वें)

(२) "येथेच गाअिलीं असतीं आपण गाणीं
भूतेंसल मरुनी स्फूर्ती रानोरानीं. ध्रु०,
लामली जिवाला येथे प्रेमळ जोड,
लागले निघाया सवादी स्वर गोड,
तरळली पुढे मधुस्वप्नें लावुनी ओढ,
परि कधी निमाली मोहनसुन्दर वाणी !" १ (गिफ २१)

'मुग्धकलिका' (दक २२), ताम्बेकृत 'ते कान्त यापुढे'— (तास २६५) आणि 'स्त्रीहृदयरहस्य' (तासक १७०) या कविता भूपतिजातीं आहेत. पुष्कळा भूपतिजातीच्या द्विपदीमालेमध्ये विषमचरण खण्डित असतं आणि तो तुकडे तुकडे करून लिहिण्याच्या पद्धतीमुळेच जाति वेगळी वाटते.

(४) "जन सकल जादुने विकल ठिकाणीं खिळले;
दचवे न, न हलवे, जणु चित्रें ते बनले." (तासक २४)

'पाडवा' (तासक ६८), 'वियोगिनी' (तासक ६९), 'आजीकडे न्या!' (तासक ८२) आणि 'शिशुवक्षन' (तासक ८४) या कवितांत हा प्रकार आढळतो. 'पद्मिनी' (विक २३), 'हालत्या रिमल्पानाय' (गोवा १३१) अित्यादि कवितांत अन्तरा [-।प।-+ऽ--।+], या मालिनीमात्रावलीचा आहे.

'ब्राह्मकन्या' या भाषान्तरित काव्यांत भूपतिमात्रावलीच्या विशिष्ट यमक बान्धणीच्या चतुष्पदी आहेत.

(५) "या अिथे तरुतळीं अेक वही कवितेची,
भाकरी अेक, अन् सुरअी अेक सुधेची,
आणखी अेक तू जवळ गात या विजनीं,
अन् हें न रानं मग, नन्दनवन तें हेंची!" (मातृद्रा ११)

'कणिका' या काव्यप्रकारासाठी (पुढे पृ ३८७ पहा) लीलारतिजातीची योजना करण्यांत येते तशी भूपतिजातीचीहि होअू शकेल.

पाठीस लागुनी पोट छळी मनुजाला
प्रच्छन्न जगावर अुपकारच हा झाला.
पोटाची चिन्ता ज्यांस असे किति थोडे!
स्वास्थ्यांत परन्तु न त्यांचा जाअी वेळ,
मग लावुनि जगतीं आग पाहती खेळ! (२५८)

१३ 'जगदीश्वरवाला' [–।––+ऽऽ।प।–+]

भूपतिमात्रावलीच्या पहिल्या आवर्तनांत शेवटीं द्विमात्रक विराम ठेविल्याने जी द्विधा मात्रावली होते तिला जगदीश्वरवाला हें नांव दिलें आहे.

"हे सुन्दरते–० तू जगदीश्वरवाला,
त्या दर्शविशी–० गूढ दिव्य रूपाला. ध्रु०
अधिकार तुझा–० थोर खरोखर आहे,
रमणीयपणा–० तुजलागी हा लाहे,
पावित्र्य खरें–० त्या ठायीं दृढ राहे,
सम्मोह पडे–० म्हणुनि अिरील जगताला." १ (सुभा)

१४ 'वंशमणि' [।प।प।–+]

"त्रिभुवनपालक मानीं मम राम धणी. ध्रु०
अेक अयोध्यापुरीं रघुवंशमणी
दशरथ, चार तयाला सुत फार गुणी.
राम ज्येष्ठ सर्वांमधि जो बाळपणीं
वधुनि ताटिका राहे मुनिवर्यजनीं." १ (चित्र ४९)

'गांवीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून' (केक १९) आणि 'स्वप्नामध्ये स्वप्न' (केक ९६) या कविता या जातीच्या आहेत. अुमरखय्या-

मकृत रुबाया हें प्रस्तुत लेखकाचें मूळ फार्शीवरून भाषान्तर आणि त्या भाषान्तराची अर्पण पत्रिका '?' हीं याच जातींत आहेत.

"म्हणाति, दुर्लभ सुधा महोत्सव गोड,
मी म्हणतों, अजि हा द्राक्षासव गोड !
घे ही रोकड, अुधार तीं सोडुनि दे,
गमे दुरूनिच की दुन्दुभिरव गोड." ( अुरुरु ३५१ )
"स्वप्नहीन ती रात्रीं निद्रा गाढ,
दिनीं कष्ट अन् पाणी, भाकर लाड,
सन्ध्याकाळीं विजन, स्नेही, कविता—
काय यापुढे साम्राज्याचा पाड !" (अुरुरु अर्पणपत्रिका २०)

३५ 'नगराज' [ | – – + ऽऽ | प | – + ]

( १ ) "सोडुनिया – ० तुज जातों नगराजा,
लीनाचा – ० प्रणाम घेअीं माझा.
आताचा – ० सरला ऋणानुबन्ध,
तोडावे – ० म्हणुनि लागती बन्ध." ( कावि ८२ )

( २ ) "आलों शरण तुला. ध्रु०
श्रीरङ्गा – ० दे मजला सत्सङ्गा. १
रघुनाथा – ० अवढी तव गुणगाथा. २
भगवन्ता – ० तारीं विठ्ठलपन्ता." ३ ( विदप ६ )

अनन्त काणेकरकृत 'अेकाचें गाणें' ( काचा ५१ ) ही कविता या नगराजजातींत आहे.

३६ 'लीलारति' [ – । प । प । ᵕ + ]

( १ ) "अुद्धवा, अेक कृष्णाची लीलारती,
सुचवोनि कसा मज गेला मधुरेप्रती." ध्रु०
रचिलें बहु यमुनेंत (चि) पंकजापदीं,
गोवर्धन धरिला अिन्द्र धरितां हटी,
यमुनेंत मिळाले नन्द, मिळेना बुद्धी,
कादिपले निजपुरवासी घालुनि मुठी,

याञ्चेत भुजङ्गें गिळितां प्राणेश्वरा,
धावोनि वळें सोडविलें त्या अवसरा,
अहिदेहांतुनि अुद्धरिलें विद्याधरा,

आठवूं किती अुपकारा नाही मिती—
सद्गदित विलापे माय यशोदा सती." १ (राघव–पद्य ३/२१०)

'चोखयाच्या महारीची विनन्ति' (पोया २७), 'नव्या युगाचा काव' (पारा १), 'रोहिणी' (पारा १०), 'हिरण्णी' (पारा ४६), 'वाटसरू' (पारा ६४), 'दूर कोठे तरी' (पारा ७१), 'बालकवि' (पारा ९१), 'तिथे' (पारा ९६), 'माझ्या खेड्ेगांवीं' (पारा १०७), 'मञ्जुला' (फास्फू ४६), 'सन्ध्याकाळीं' (फास्फू ६३), 'खेड्यांतील देखावा' (फास्फू ११०) अित्यादि कविता या लीलारतिजातींत आहेत. मञ्जरी हें एका वृत्ताचें नाव असल्याने या जातीला मञ्जरी म्हणून जें नाव पूर्वी देण्यांत आलें होतें त्याचा त्याग करणें अपरिहार्य झालें आहे.

भूपतिजातीप्रमाणेच या जातीच्यादि द्विपदीमालेंत केव्हा केव्हा विषमचरण खण्डित असतात.

( २ ) " तो भासच सगळा, जरी स्वप्न तें तरी
हुरहूर आगवे मनांत का ही परी ?
मावळली मोहक निशा, धवळल्या दिशा,
या अजून नयनीं लुपति तारका कशा ?" (केगी ५०)

ही कविता या प्रकारची आहे.

"जपानी भाषेंत 'टांका' म्हणून अेक काव्यप्रकार आहे. यांत पांच चरण असून पहिले दोन नि शेवटले दोन सममक असतात. अेक भावना, कल्पना अथवा अेक विचार या पद्यरचनेंत प्रथित केलेला असतो. मात्र वाच्यार्थ रूपकात्मक भाषेनें बहुशः सुचविला जातो. कविवर्य रवीन्द्रनाथ यांनी अशा प्रकारची पुष्कळ रचना केली आहे." अशी प्रस्तावना करणारे रा. गोपीनाथ तळवलकर यांनी 'कणिका' हा प्रकार मराठींत आणून त्याच्यासाठीं या दीर्घायतिजातीची योजना केली आहे. ते म्हणतात,

(३) "काळाच्या पुलिनीं ठेवा निज पाउलें
हें थोर जनांनी सदैव अुपदेशिलें;
परि दिनरात्रींच्या तुफान लाटांमधे
हें धुवूनि निघतें वाळवण्ट नेहमी,
मच पदचिन्हांच्या शाश्वततेची हमी." (विविमा १९३०)

(४) "ही मोट मरे भरभरा, चढे करकरा,
विहिरींत वघा वाकुनी जरा धाकुनी,
पाण्यांत लशी मोवरें, फेस गरगरें,
हें काम राहिलें, करा, कसा कम्बरा." (देनाथ–सुगी ७८)

या गीतांतील मात्रावलींत दुसऱ्या आवर्तनांतील तिसऱ्या मात्रेनन्तर खण्डन आहे. 'शेत्याची शीळ' (सुरेश–कभा ४०) या पद्यांतहि याच ठिकाणीं खण्डन आहे.

पुढील कवितांत ध्रुवपदें भिन्न भिन्न असलीं तरी कडवीं [–।प।प।४+] या मात्रावलीच्याच चतुष्पदींचीं असल्याने त्यांची जाति लीलापति हीच ठरेल.

(५) "मज विफल गमे गे जीवित माझें सखे !
सुख किती जरी ऽऽ भुगेच ही परी मिळति न विशुचे मुके. ध्रु०
मी दिवत वरूं गे कुशी स्वलें कुणा ?
मी माझ्या मुरिंचा घाव भरूं गे कुणा ?
सुख मधुनि कोणतें स्वर्गांहि मानूं अुणा ?
हो स्वर्गसौख्यही मातृपदाविण फिकें !" १ (यघ १४३)

(६) "ही प्रभातकालीं राहुनि धावेवरी
हाकते मोट कुणी सुन्दरी. ध्रु०
खोविला निरीवर पदर कसुनि कटितटीं,
झळकते कान्ति किति नील आरुणी पटीं !
ही मराठमोळ्या सुरत रम्य गोमटी,
आपुढ मुडवुनी मजेंत पाण्यावरी !" (यजप–सुगी ४४)

( ७ ) "हासरीं नाचरीं मुलें अशीं हीं गुणी,
धावती भटकती साऽऽरीं हीं अशींच गगनाङ्गणीं. ध्रु०
हीं अुल्हासानें भुरभुर येअुनि किती
बघ जमलीं शेजारचीं मुलें भोवती,
हीं गळ्यांत घालुनि गळा असें खेळती,
झळकती डोअिचा तुरा मधें राहुनी." १ (कोदंभि-चाबोमा ५१/८)

२७ 'सन्तति' [ –।प।प।+ ]

( १ ) "जो भेद विधीनें स्त्रीपुरुषीं केला
देहींच मात्र तो सन्तति-कार्याला." (देशा ११)

( २ ) "अव्यक्त मूर्ति मी रचितों जगतातें
मृत्तिका घटिं, नगीं सोनें जैसें तें.
हीं माझ्या ठायीं जाण सर्व भूतें,
परि त्यांत नसें मी, पाहीं शुद्ध मतें." (गया)

'त्यज मना कामना विषयाची आता' (खाक ६७) ही कविता या सन्तति-जातींत आहे.

२८ "मालि-याला" [ –।प।–+ऽ~~।+ ]

शुद्धमात्रावलीला अेक रगणाची जोड दिल्यानें ही मात्रावली सिद्ध होते. छन्दःप्रभाकराच्या ५६ व्या पृष्ठावर अुद्दिष्टलेली नरहरिजाति अशीच आहे. पण नरहरिजातींत अन्तीं रगण चालत नाहीं, नगण आणि अेक गुरु अशीं चार अक्षरें लागतात. या जातींत असें बन्धन नाही. या मात्रावलीचा अन्तरा पुष्कळदा भूपतिजातींत असतो. पुढील दोन पद्यें मात्र या मालियालाजातींत आहेत. अन्तरें भिन्नभिन्न आहेत.

( १ ) "बुणि ग्या हो ताजीं ताजीं हीं फुलें.
परि घाट पहाती माअू तान्हुले.
घ्या गुलबजाअीचाफा- मोगरा.
कल्याण करिल देवाजी घ्या तुरा.
ही स्वस्त लाविली वेणी,
अेकेक बटी अभुनी

आभारयुक्त भिजवूनी
देईन तुम्हांलागोनी, ग्या फुलें." (दक ७४)

(२) "कोठुनी बोल रे येथी मारुता !
घरिसि कां असा शान्तीसी मारुता !
टाकिलें कुठे गन्धासी मारुता !
ही तुझी सिंच वाणी
जणु शुष्क हास्यावाणी
मजपाशीं येशि दिसुनी,
जाहलें काय चित्तासी मारुता !" (टेआ ३/७९)

३९ पादाकुलक [।प।प]

(१) भामिनि, तुझिया या मधु रागें
वल्लभ होइल दूर कसा गे !
अशोक तुजला दिसोनि येतो
होता पादाकुलक फुले तो. (२५९)

(२) "त्रिदशपतिमुकुटतटगतमणिगण–
करनिकरसलिलधाराधौत–
क्रमकमलयुगलजिनपतिरुचिर–
प्रतिबिम्बविलयविरहितनिलयात्." (पून १)

(३) "मणिगणमुकुटीं दिनकरमेळा
भ्रुवनासुरगुरु सुघटित वेळा
कौस्तुभपदकीं तेज विराजे
मण्डित माळीं मृग मद साजे." (मुराभु ६४९)

(४) "बघुनि तया मज होय कसेसें,
सुचरिता मना, कां भरुनि तुज पिसें ! ध्रु०
हीन दीन मी ब्राह्मण विधवा,
तृणसम जन मज टाकि जणु शवा;
वासना–सुतें भिवविति जीवा,
शरीर जीवा हें घडगेसें." १ (तासक ११२).

(५) "अशी तुतारी द्या मज आणुनि
फुङ्किन जी मी स्वप्राणानें,
भेदुनि टाकिन सगळीं गगनें
दीर्घ तिच्या त्या किङ्काळीनें
अशी तुतारी द्या मज आणुनि." (केक १०३)

या पञ्चपदीचा अुपयोग 'दसरा' (गोवा ७०) या कवितेंत केला आहे; आणि 'सुधारक' काव्य सबन्ध याच प्रकारचें आहे.

(६) "मज गमे ऐसा जनक तो माझ साचा! ध्रु०
मुख सुरकुतलें, मस्तक पिकलें,
शरीर रोगांनी पोखरिलें,
श्मशान ज्यानें सन्निध केलें
त्या प्रेताला दुहिता विकितो." १ (देश ३७)

या पद्यांत ध्रुवपद निराळ्या मात्रावलीचें आहे; पण कडव्यांत पादाकुलकाचीच चतुष्पदी असल्यानें या पद्याची आणि यासारख्या 'कोणता मानूं चन्द्रमा?' (देगुह) या कवितेचीहि जाति पादाकुलकच मानिली पाहिजे. गिरीशकृत 'भलरी' (गिफ ४६) हें कुणब्याअु बोलींतील शिथिल पद्य पादाकुलकजातींतच आहे. काही चरण मात्र [प। ‒ ‒ ⏑ +] असे मुरजयी आहेत.

मोरोपन्तांचें कल्याणरामायण ज्या पज्झटिकानामक पद्यप्रकारांत आहे त्याचा समावेश पादाकुलकजातींत होतो. पज्झटिकेंत पज्झाचा पहिलाच प्रकार असतो आणि दुसऱ्या आवर्तनाच्या आरम्भीं गुरु अक्षर असावें लागतें असें छन्दोमञ्जरीकार गङ्गादासाच्या मतें (गछ ६/१९) म्हणतां येअील. पण मोरोपन्त ही दुसरी अट पाळीत नाही.

कटाव या कटिबन्ध म्हणून जो पद्यप्रबन्ध आहे त्यांत अुद्दव द्विपदीचें ध्रुवपद असून पुढे पादाकुलकाच्या काही अेका यमकानें जोडलेल्या चरणांचे

१ "अमृतेश्वर कटिबन्ध जनांच्या रसनेनें वदवी" हा अमृतरायाचा स्वतःच्या कटिबन्धरचनेविषयींचा अुल्लेख मात्र अेका 'चन्द्रकान्तजातीय पद्याच्या अन्तीं केलेला आहे.

गट असतात आणि अेका गटावरून दुसऱ्या गटावर जायला मध्यें जो पद्याचा अष्टमात्रक अन्तरा असतो त्याच्याशी पुढील गटाचें यमक साधिलेलें असतें. कडव्याच्या अन्ताचा सम्बन्ध यमकानें ध्रुवपदाशी जोडलेला असतो. गटांतील चरणांची सङ्ख्या निश्चित नसते. धावती रचना करायला हा अेक सोयीचा पद्यप्रबन्ध आहे. अमृतराय कवींचे कटाव जितके सुप्रसिद्ध तितकेच ते शिथिल आहेत.

४० 'मुरजयी' [।प।--॰+ऽ]

"मण्डितहल्लीशकमण्डलाम्
नटयन्राधां चलकुण्डलाम्
निखिलकलासम्पदि परिचयी
प्रियसखि पश्य नटति मुरजयी ध्रु०
मुहुरान्दोलितरत्नवलयम्
सलयं चलयन्करकिसलयम्
गतिमङ्गिभिरवशी कृतशशी
स्थगितसनातनशङ्करवशी" (रूस्तमा २६८)

४१ "कर्णफुल्ल" [-।प।---]

या मात्रावलींत अन्तीं विराम नाही पण खटका येतो त्यामुळे अन्तीं लघु अक्षर येअूं शकतें. प्राकृतपैङ्गलांतील सिंहावलोकन आणि पज्झटिका हे पद्यप्रकार या कर्णफुल्लजातींतच बसतात. यांचीं अुदाहरणें

(१) "हणु अुज्जर गुज्जर राअदलं
दल दलिअ चलिअ मरहट्ठबलं
बल मोलिअ मालव राअकुला
कुल अुज्जल कलचुलि कण्णफुला" (प्रापै १/१८५)

(२) "जे गंजिअ गोला हिवअि राअु
अुद्दंड ओड्ड जसु भअ पलाअु
गुरुविक्कम विक्कम जिणिअ जुज्झ
ताकण्ण परक्कम कोअि बुज्झ (प्रापै १/१२६)

(३) " मुनि नारद नारायणवाणी
ऐकूनी हासे पिटि पाणी. ध्रु०
किति अुत्सुक होशी गोपाला,
मनुजापरि करिशी या लीला
तव अन्त न लागे निगमाला,
आनन्दें नयनीं ये पाणी. " १ ( किम १६ )

(४) " सरदारि तुझी ती नको अम्हां!
लखलाभ आमुचा गरिबपणा.
या जगीं आमुचे अम्ही असूं,
अितरांना तैसे अितर दिसूं. " ( टेआ ३/१०३ )

'धोंजपाअूस' ( सुमी २५ ) आणि 'मोल्या' ( मादि १५ ) या कविता या कर्णकुलजातींत आहेत.

४२ 'राजसा' [ -।ऽ।+ऽ०+ )

" मन्मानस—हंसा राजसा,
कां विषयीं टपसी काकसा ? ध्रु०
जे विषयजनित वय भोगही
व्यापूनि राहती ही मही
ते प्राप्त कराया धर्मही
सोडूनि बससि रे म्याडसा. " १ ( पस्तै २९ )

४३ 'अचलगति', "बालानन्द " [।ऽ।--+]

(१) " दीनजनावन दाशरथी
चरित सरस दे अचलगती. " ( निक १/३ )

(२) " तारकदीक्षा देअुनिया
भजनीं करीं लेअुनिया " ( केस्वा—पद १/३५६ )

(३) " दिवस बोलतो, 'अुठा झणीं'
रात्र, 'विसावा घ्या' म्हणते,
या दों वचनीं दिनरजनी
बहुत सुचविती मज गमतें. " ( केक १६२ )

(४) " अजि पुनवेची शारदि रात्
शिङ्गत आला तारानाथ्
आल्या मुखरिणि या बाहेर्
चन्द्रामोंवति धरिती फेर्." ( तासक १५० )

केशवस्वामीची या जातीची रचना विपुल आहे. निरञ्जनमाधवकृत 'निर्वोढ राघवचरित,' नि निरञ्जनमाधवाच्या श्रीज्ञानेश्वरविजयाच्या ८ व्या अध्यायाचा अुत्तरार्ध हीं या जातींत आहेत. 'भृङ्ग' ( केक ६३ ), 'निर्झरास' ( बाक १४ ), 'कारन्जें' ( च १०३ ) अित्यादि कवितांत अन्तरा नाहीं. 'हरपलें श्रेय' ( केक १९६ ) या आणि अनेक सुप्रसिद्ध कवितेंत पद्मगणाचा अन्तरा असतो. 'आवाहन मन्त्र' ( तासक २० ) या कवितेंत मात्र अन्तरा [ ।−−+ ] या मात्रावलीचा आहे.

४४ 'अुद्धव' [ −।प।−+ ]

हें नाव मध्वमुनीश्वराच्या 'अुद्धवा शान्तवन कर जा' ( मगुक ६१ ) या सुपरिचित पदावरून घेतलें आहे.

( १ ) " अुद्धवा सुखी आहे की
तो मनमोहन हरि माझा ? ध्रु०
अुद्धवा, जन्मला येथे
हरि, पाहीं त्याची न्हाणी.
या स्थळीं घातलें पार्यी
कृष्णास अुष्ण मी पाणी.
अैकुनि त्या हरिची छाळलें
गोपींचीं बहु गान्हाणीं.
पाठविला धेनूपाठीं,
त्याची ही घोंगडि–काठी.
घालितां जेवुं या ताटीं
पदला मज पान्हा पाजा
तो मनमोहन हरि माझा. " १ ( ग्राम-पद ३/२८२ )

(२) " दुन्दुमी दुमदुमे मारी,
विजली जशि चमके स्वारी ! ध्रु०

दुन्दुमी दुमदुमे मारी,
· नभमण्डल भरिती मेरी,
किती धुन्द दिशा या चारी !
रणकन्दन माजे भारी ! " १ (तासक ४७)

या जातींत अगणित कविता आहेत. ' राजहंस माझा निजला ' (गोवा ६५) आणि तिवारीकृत ' मर्दानी झांशीवाली ' या दोन कविता विशेष प्रसिद्ध आहेत. जळगांवचे कवि द. आ. तिवारी यांची सुप्रसिद्ध सङ्ग्रामगीतें याच अुद्धव जातींत आहेत. ' मुरली ' (गोवा ९९) या कवितेंत, पुढील ध्रुवपद जोडून म्हणतां यावें म्हणून कडव्याच्या अन्तींचा ओकार न्हस्व केला असला तरी तो दीर्घ घ्यायला अडचण नाही. तसें केले म्हणजे गोविन्दाग्रजांची ' मुरली ' ही सुप्रसिद्ध कविता अुद्धवजातीचीच ठरते.

(३) " हे प्रभो विभो ऽऽ अगाध किति तव करणी ! ध्रु०

चान्दवा नभाचा केला,
रविचन्द्र लटकती त्याला
जणु हुम्मर सुबक ठताला,
मग अन्थरिली ही धरणी. " १ (कोमू)

आणि मग या चालीवरील ' प्रीतीचें गाणें ' (गिआ १०६) हेंहि अुद्धव जातीचेंच ठरतें. आर्यरचनेंत अन्त्य गण केव्हा केव्हा ( ◡ + ) असा आढळतो.

(४) " नग पळून जाशुं तु नारी,
जरा थाम्ब धीर माघारी ! ध्रु०
त्यो मोऽर तू मोरिन
का जातिस त्येला टाकुन
मार्ग लागून माझा धनी
आला धावत कुण्यावानी. " १ (देमृ ८)

यदावन्तकृत 'न्याहारीचें गाणें' (यघ १२१) ही कुणबाऊ बोलींतील कविता याच प्रकारची आहे.

४५ 'आनन्दरस' [−।+ऽ⌣−−।−+]

(१) "आनऽन्दरस हा प्याला
भक्ताऽप शान्तचि झाला." (?)

(२) "कमलोंऽत मधुकर आला,
आकऽण्ठ तो मधु प्याला,
तरिहीऽ न तृप्त जहाला,
क्षुटवेऽ न तेथुनि त्याला. (बेश्रीगो–यमा ४७–४८/५०)

४६ 'शुद्धसती' [।प।−+]

(१) "शुद्धसतीव्रतवित्ता
अहमसिनिर्मलचित्ता
प्रथयसि सुजनविमुक्तम्
नर्मेदं किमयुक्तम्" (रूस्तमा २७१)

(२) "नारायण नारायण जय गोविन्द हरे
नारायण नारायण जय गोपाल हरे ध्रु०
करुणा पारावारा
वरुणालय गम्भीरा १
घननीरदसङ्काशा
कृतकलिकल्मषनाशा" २ (बृस्तो ५१)

(३) मावें मज त्यासी मज त्यासी. ध्रु०
दाखवि सर्वनिवासी
चिन्मय भाग्यविलासी
केवळ निजसुखराशी
मजनें भवमय नाशी. (केस्वा–पस १/६९४)

(४) "विवेक जागा केला म्हणुनी सुख झालें, सुख झालें. ध्रु०
अनुभवतरुवरि चढलों
समाधिडोहीं बुडलों

अद्वयरामीं जडलों
स्वयम्प्रकाशें घडलों." ( केल्ला–पत्र १।३१२ )

४७ 'पर्वती' [ नि । प । ᵕ + ]

( १ ) "हींच का नानांची पर्वती !
खाली इत्ती झुलती किती !
वाजे सनजि गोड मञ्जुळ
वाटे गातो की कोकिळ." ( अना १२ )

( २ ) "मी झुरत सदा अन्तरीं, नाथ कधि येतिल गे मन्दिरीं ! ध्रु०
वाजतें हळुच कुठे पाउल
तींच हो श्रवणांची चाहुल
पडे का अशी मनाला भुल
झालि गत चुकल्या हरिणीपरी." १ ( सोका २८ )

'माझ्या सोपीचा मृत्यु' ( तुमी ७४ ) ही कविता या पर्वतीजातींतच आहे.

४८ 'भरतखण्ड' [ – । प । ᵕ + ]

( १ ) "हा भरतखण्ड आमुचा ! ध्रु०
त्याच्याचसाठि कीं जगूं
त्याच्याचसाठि की मरू
जो देव साच आमुचा,
हा भरतखण्ड आमुचा." ( टेभा ३/१७६ )

( २ ) "अणु नील मण्यांच्या द्रवीं
पाचूचा पडला खडा,
तेंच हें वृत्तें जरि खरें,
मा खडपास गेला तडा.
मेघांच्या अजुनी जिथे
स्वागता राज जरि कुडे,
नच दिसती आता परी
हासरी जिथे स्वाक्षरें."

( माधव–नवी दिवाळी अङ्क १९३९ )

'शोफर' (माअ १९) ही कविता या भरतखण्डजातीची आहे.

पुष्कळदा या जातीच्या पद्यांत त्रिपद्यांची माला असते आणि ध्रुवपदच तेवढें सूर्यकलेचें [।प।५+,नि।प।५+] असतें (पृ ३३७ पहा).

(३) "सुरेख सङ्गम किती ऽ कृष्णा भेटलि कोयनेप्रती. ध्रु०
किति विशाल तट हें अहा!
प्रिय सखे, जुमी तू रहा,
क्षण येयिल शोभा पहा." १ (मानुक ११९)

पुढील पद्यांत प्राचीन लावणी पद्यांतील चौथिल्याचें अनुकरण आहे.

(४) "गेलें तुझ्यावर जडून रामा, मन गेलें तुझ्यावर जडून! ध्रु०
किति नटून सजून मी आलें!
किति अलङ्कार हे ल्यालें!
किति नाजूक गेलें वाकि होऊन!" १ (गिका ८६)

(५) "सखे गे प्रशान्त किति यामिनी ।। ही तशीच जलवाहिनी. ध्रु०
ही विशालत्वा कितितरी
तव भुदार हृदयापरी!
करूं विहार चल तीवरी." १ (यश १४५)

४९ 'भुवनसुन्दर' [अ।प।+]

(१) "आरती भुवनसुन्दराची
अिन्दिरावरा मुकुन्दाची"

या सुप्रसिद्ध प्राचीन पद्यावरून या जातीचें नांव ठेवण्यात आलें आहे.

(२) "गड्यांनो, घ्या हरिच्या नामा!
लिहितां कशास ओनामा!" (विप ४९)

(३) "सुकाली नूर्मी पेरियली,
पलाशा मदा मनीं धरिली." (किम ४१९)

या जातीच्या काही पद्यांत (अ।—५) या मात्रावर्तनाचा अन्तर असतो. पन

"सन्तत भरि तू सनुमनिंदा
मनुजा, मज यज यदुपतिंदा"

आणि " हातीं धरुनि नरा माला
का रे स्मरसि न रामाला "! ( साक ७४ )

या नारायण धोंडदेव खाण्डेकरांच्या दोन कवितांत अन्तरा नाही.

(४) " सुरवर-मधुकरसत्कमला,
ओंवाळती करूं तुजला. ध्रु०
रञ्जितजराजूटगङ्गा
क्षमावदनाञ्जदृष्टिभृङ्गा
गुणगणमण्डितमरमाङ्गा
कोटिरविदीप्ति वदनीं झळके
फणामणि सर्वांङ्गीं झळके
जेवि धगधगित
वीज झगझगीत
गौरि चकचकित,
चकली विधि-हरि-नेत्रांला. १ " ( किम ८२ )

" न हे दिन यौवनविलासाचे " ( विक १२० ) आणि ' नटेश्वराची आरती ' ( सासक १२५ ) या कविता या भुवनसुन्दरजातींत आहेत.

५० ' सिंहनाद ' [ -।ग।+ ]

( १ ) " गोविन्दा रामा हो,
गोपाळा रामा जी. ध्रु०
जय भीमातिरवासा
भयभञ्जनहारका जी
गोकूळगोपवेशा
करिमर्दनायका जी
दिनबन्धु दीननाथा
भवसागरतारका जी
पावना विश्वपाळा
त्रिलोकीत्राणदायका जी." ( देव २८ )

(२) "स्वातन्त्र्यदेवतेचा
गाऊं या धन्यवाद;
पर्वणी थोर आली
गर्जवूं सिंहनाद!" ध्रु०

सौभाग्यतिलक ल्याली
हिन्दभू आज भाळीं.

स्वातन्त्र्यमन्दिराची
स्वामिनी पूर्ण झाली

हिमधवल यशोध्वज तो
फडकवी अन्तराळीं,

*आजचा दिव्य महिमा*
वर्णितां थकति वेद." १ (अुपो ७१)

देवनाथाचें 'सद्गुरु मायबापा। ये त्वरें नायरया' हें पद्यहि याच सिंहनाद जातींत आहे.

*सद्गीं निस्सङ्ग महाराष्ट्रङ्ग हा अेक पिशङ्ग* (२६०:)

५१ "पिशङ्ग" [।ए।+]

"भगव्या बाण्याचे
असङ्ख्य रणगाजी

कलिजा रायाचा
परन्तु तानाजी

काटक अुमराठी
मराठि अुमराव

मालुसरा मर्द
रण–रुस्तुमराव

रण–रुस्तुमराव
चौं मुलखीं नाव." (माधव, सुवर्ण-सप्टेंबर १९३४)

५२ 'रेवती' [-|-+ऽ-॰|+ऽऽ+,-|-+ऽ-॰|+]

(१) "रुचती कां तीर्थयात्रा या समयीं त्यास ती ?
मजवरची प्रेमबुद्धी कां हरिची लोपती ?
दादांना अन्धजांची भक्ती कां लागती ?
या कृत्या साह्य होती कां वहिनी रेवती ?" (किग्र ४८७)

(२) "शैवालें युक्त जैसें पङ्कज तें शोभतें,
शशिमाजी लाञ्छनाची बहु शोभा दीसते,
तैशी ही वल्कलाने किति नामी वाटते !
जातीच्या सुन्दरांना काहीही चालतें." (किग्र ३२९)

विनायककृत 'पद्मा' (विक १९) हें काव्य या रेवतीवृत्तांत आहे.

५३ 'धात्री' [॒॑|॒॑|---+|ऽऽ]

५४ 'शारदा' [॒॑|॒॑|---+|ऽऽ॒॑|॒॑|-॰+]

५५ 'मोहिनी' वा 'महाराष्ट्रलक्ष्मी' [॒॑|॒॑|---+|ऽऽ॒॑|॒॑|++]

५३ धात्री [|॒॑|॒॑|---+|ऽऽ]

"माय-बाप रूपें धरिशी,
योग्य समय पाहुनि देवा,
पूर्ण बालकाशा करिशी. ध्रु०
झोप मुला लागे गात्रीं,
सुखें निजे तें तव गात्रीं,
पाजिशी स्वरस तू धात्री
तृषा त्या नकळतां हरिशी." १ (सुभाल)

५४ 'शारदा' [|॒॑|॒॑|---+|ऽऽ॒॑|॒॑|-॰+]

शारदा हें नांव देवलकृत 'जरी कुणा श्रीमन्ताची सुत होय शारदा' या चरणावरून दिलें आहे. त्या पद्याच्या कडव्याची घटना निराळीच आहे.

(१) "प्रिया काय घेतां निद्रा मृत्युची मयङ्करा !
ऊठा अहो धीरा वीरा शूरसिंह सुन्दरा ! ध्रु०

मोडुनिया पाठीवरची रक्तमिश्र माकडी
दोन प्रहर भरले कान्ता, करा चला न्याहरी,
तुम्हांवीण सेना सारी लेश अन्न ना धरी,
अुठा चला येतिल आता शिवप्रभू गम्भिर !" १ (गोक ४०)

याच कवितेंतील अितर कडवीं पुढील म्हणजे मोहिनीजातींतील आहेत.

५५ 'मोहिनी' या, 'महाराष्ट्रलक्ष्मी' } [ | ⏑̄ ⏑̄ | ⏑̄ ⏑̄ | – – – + | S S ⏑̄ ⏑ | ⏑̄ ⏑ | – + ]

(१) "महाराष्ट्रलक्ष्मी मातें जगीं धन्य वाटे,
यशोगीत तीचें गातां मनीं हर्ष दाटे. ध्रु०
पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाळ,
बोध हाच अितिहासाचा सदासर्वकाळ,
कासया वहावी चिन्ता मनीं मग जहाल ?
रात्र सरे तेव्हां शुभवे दिनहि पूर्ववाटे." १ (विक ६)

(२) "सोड सोड आता अपुल्या गोड मोहिनीला !
मधुर गान अैकायाला जीव हा भुकेला. ध्रु०
जोड नको सारङ्गीची साथ द्यावयाला,
नको गडे वीणेवरती फिरवुं अङ्गुलीला,
सूर नको, ठेवी खाली ठेव सतारीला,
अेक तार ही बोलेना अैकुनी सुराला !" १ (गिका १४३)

'खरें क्षत्रियब्रीद' (विक ११५), आणि 'मनमोहिनी' (यघ १०८) अित्यादि कविता या जातींत आहेत.

मोहिनीचें कडवें अेकचरणी असल्यास ध्रुवपद 'परवशता पाश दैवें ज्याच्या गळा लागला' या चरणाप्रमाणे लिहिण्यांत येतें. परन्तु 'ज्याच्या' या शब्दांतील दुसरें अक्षर उच्चारतः लघु आहे. तें तसें लघु रचिल्यास ध्रुवपद जातिदृष्ट्या रेवती या पद्मावर्तनी मात्रावलीचें होतें; अथवा तें [ | – ⏑ ⏑ – | – ⏑ – ⏑ | – ⏑ ⏑ – | – ⏑ – ] या भृङ्गावर्तनी मात्रावलीसारखेंहि असेल.

" मज म्हणशी ' भूर जाऊं ' आजी कुठे साङ्ग तें. ध्रु०
थवा पाखरांचा जातो अुडुनि काय तेथे !" १ (पारा ७०)

" जगताच्या सूत्रधारा लीला तुझी निठुरा ! ध्रु०
विसंवाद निर्मुनि सारा हासशी कठोरा. " १ (यग ११०)

२ अग्न्यावर्तनी

५६ 'जीवकलिका' [∪ – – – | ∪ – – – | ∪ – – – | ∪ – – +] २८ मात्रा
५७ 'वल्लभा' [– – ∪ – | – – ∪ – | – – ∪ – | – – ∪ +] २८ मात्रा
५८ 'मध्यरजनी' [| – ∪ – – | – ∪ – – | – ∪ – – | – – – +] २८ मात्रा
५९ 'फालगङ्गा' [| – ∪ – – | – ∪ – – | – ∪ – – | – ∪ +] २६ मात्रा

५६ 'जीवकलिका' [∪ – – – | ∪ – – – | ∪ – – – | ∪ – – +]

" जरी तू गोड वाणीने मला अुपदेश करितास
विमल मी जाहलें असतें सकल जाअुनिया दोष;
परी मग जीवकलिका ही अकालीं फुलुनि येअील,
तिचा हो गन्ध मग अपुरा, खुरटती पाकळ्या लोल. " (दे-निमा १३)

निर्माल्यमाला या पुस्तकांतील पूर्वार्ध 'माला' म्हणजे सौ. विमलाबाअी देशपाण्डे यांचीं २२ पद्यें या जीवकलिकाजातींत आहेत.

५७ 'वल्लभा' [– – ∪ – | – – ∪ – | – – ∪ – | – – ∪ +]

(१) " चल याकुनी बघतेस का ? चल वल्लभे बघुं वाकुनी ! ध्रु०
वरती सभोतीं हें धुकें लाटांवरी लाटा किती
तव कुन्तलीं वक्षावरी कणिका हिर्‍यांच्या फेकिती !
वेणींतल्या पुष्पांवरी जलमौक्तिकें झालीं जमा,
मुख रङ्गलें श्रमविव्हले, धरि शिक्तचम्पकविभ्रमा.
—कां हासशी टक लावुनी अधरोष्ठ दातें रोकुनी—" (गोदल-अुन्रा ४९)

प्राकृतपैङ्गलांतील हरिगीतिकेचें अुदाहरण याच जातींत बसेल.

(२) " गअ गअअि दुक्किअ तरणि लुक्किअ
तुरअ तुरअहि जुज्झिआ

रह रहदि मौलिअ धरणि धौलिअ
अप्पपर णहि बुज्झिआ
बल मिलिअ आइअ पत्ति जाइअ
कंप गिरिवर सीहरा
उच्छलअि साअर दीण काअर
बअिर बढिअ दीहरा" (प्रापै १/१९२)

(२) "सीतावरं गुणसागरं मज सादरं अनुवासरम्
कनकाम्बरं रविभास्करं दमितासुरं करुणाकरम्" (विदप ३६)

गज्ञलाञ्जलींतील 'मूक मागणी,' 'तू आणि मी,' 'निर्माल्यसमर्पण,' 'तेथेच,' 'येथेच' आणि 'प्रेमाचा अुदय' (पृ. २५-३०) या कवितांत प्रत्येक गणाच्या पहिल्याच गुरूच्या ठिकाणीं विकल्पानें दोन लघू येत असले तरी त्या कविता या वल्लभाजातींत आहेत असें म्हणायला प्रत्यवाय नाही.

५८ 'मध्यरजनी' [—ᐯ——|—ᐯ——|—ᐯ——|—ᐯ—+]

"जाहली मम मध्यरजनी, होयतों मी गाढ शयनीं. ध्रु०
जाग तू भरदिवस तव ये, तीन वार्षे ताप सलये,
मित्र-मैत्री जोड समयें, विसर मज दे ठाव न मनीं," १ (सुजी)

"काय घेअुनि करिशि छाया? ज्योतिवाचुनि दीप वाया! ध्रु०
सोड सुहृदा तू तृपा ही, हो न अन्तरिं खिन्न कांही,
प्रेम देतों घे सदाही, स्नेह जडला सुदृढ व्हाया!" (सुभा)

५९ 'कालगङ्गा' [—ᐯ——|—ᐯ——|—ᐯ——|—ᐯ+]

"अेकला हा जीव जीवर फिरत होता या जगीं
अन्धतेने काळ नेअी, जात तिकडे सहजची.
कालगङ्गा ओढि सटी काठचत् त्यामती,
मीतिमय तव दृष्टिने मज विलग केलें त्यांतुनी." १ (देनिमा ३७)

निर्माल्यमाला या ग्रन्थाचा 'निर्माल्य'नामक अुत्तरार्ध म्हणजे रा. पु. य. देशपाण्डे यांचीं २६ पदें हीं या कालगङ्गाजातींत आहेत. 'निशागीत' (माजूग ५१) हेंहि याच कालगङ्गाजातींत आहे.

### ३ भृङ्गावर्तनी

६० 'सुखराशि' [।भृ।भृ।भृ।भृ।−+] २८ मात्रा
६१ 'दासी' [।भृ।भृ।भृ।भृ] २४ मात्रा
६२ 'मदनरङ्ग' [।भृ।भृ।भृ।−⏑+] २३ मात्रा
६३ 'परिलीना' [।भृ।भृ।भृ।−+] २२ मात्रा
६४ 'रुचिरवदना' [−।भृ।भृ।भृ।+] २२ मात्रा
६५ 'धवलचन्द्रिका' [।भृ।भृ।भृ।+] २० मात्रा
६६ 'जीवनलहरी' [।भृ।भृ] १२ मात्रा
६७ 'विनोद' [−।−⏑−⏑।−+] १२ मात्रा
६८ 'रसना' [विनोद द्विरावृत्ता]
६९ 'कामदा' [।−⏑−⏑।+॥−⏑−⏑।+]
७० दिण्डी [≚⏑।−−−।≚⏑।≚⏑।−+]

६० 'सुखराशि' [।भृ।भृ।भृ।भ।−+]

यास्य जराशी
चपलचरण सखि, जाशी? ध्रु०
मुरड परत, अशी स्वारति, भषिन खवित पळ या दिव्याशी. १
मंद दे मन, करित मनन मश रेखिन सखि या चित्राशी. २
पुसतिल जन, रमणि कवण? मी म्हणेन केवळ सुखराशी." ३

(तासक १६९)

६१ 'दासी' [।भृ।भृ।भृ।भृ]

या जातीचें नाव "दासि असें मानुनिया कार्य मला सांङ्गतवे' (देमृ १९) या पदावरून घेतलें आहे.

(१) "गगनाच्या पोकळींत भिरभिर वारा वाहे,
आनन्दानें मुक्त मनें पक्षीगण अुडताहे;
वाऱ्यावरि सुटलेले दोन सुवकसे पतङ्ग
विहरोनी भूषविती गगनाचें अन्तरङ्ग." (कास्फू १२१)

(२) " डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका.
जादुगिरी त्यांत पुरी, येथ उभे राहुं नका.
घालुं कशी कशिदा मी ? होति किति बाई चुका !
बोचे सुअि फिरफिरुनी, वेळ सख्या, जाय फुका.
सळसळ किति होय मनीं !
हसतील मज सर्वजणी.
येतिल त्या संधि बघुनि आग अुगा लावुं नका ! " (ताबक ५)

६२ 'मदनरङ्गा' [ । भ । भ । भ । – ∪ + ]

(१) " वदन मदनरङ्गसदन हें त्वदीय सुन्दरी,
नयन रङ्गभूमि तिथे नटत तो नटापरी.
विविध तो करी विलास भूरवोनि त्या करीं;
कधि चपलेसम चमके; स्थिर कधीं ध्रुवापरी. " ( ताबक ३८)

(२) " गान पुरे हास्य पुरे दूर फेक बासरी;
होवो तिमिरांत लीन ही अुषाहि हासरी. " ( रेक १/१७१ )

'महाराष्ट्र–यशोगीत' ( कुयशो ८१ ) हें याच मदनरङ्गा जातींत आहे.

६३ 'परिलीना' [ । भ । भ । भ । – + ]

(१) " राधे निजकुण्डपयसि तुङ्गीकुरु रङ्गम्
किं च सिञ्च पिञ्छमुकुटमङ्गीकृत भङ्गम्
अस्य पश्य फुल्लकुसुमरचितोज्ज्वलचूडा
भीतिभिरतिनीलनिबिडकुन्तलमनुगूढा
धातुरचितचित्रवीथिरम्भसि परिलीना
मालाप्यतिशिथिलवृत्तिरजनि भृङ्गहीना " ( वृत्तमा २८४ )

(२) " घडिघडिघडि चरण तुझे आठवती रामा !
हीन दीन आस तुझी पूर्णकाम आम्हां." ( केशवस्वामी )

(३) " अजुनि चालतोंचि वाट माळ हा सरेना,
विश्रान्तिस्थळ केव्हां यायचें कळेना.
कुठुनि निघालो, कोठे जायचें न ठावें,

मार्गींतच काय सकळ आयु सरोनें जावें?
पुरे पुरे ही असली मुशाफरी आता!
या धूळित दगडावर टेंकिलाच माथा." ( रेक १/४०० )

केशवसुतकृत 'आओीकरिता शोक' (केक १९९) आणि यशवन्तकृत 'झाल्या तिनि सान्जा' (यग ३६) या कविता या परिलोनाजातींत आहेत.

६४ 'रुचिरवदना' [-।भृ।भृ।भृ।+]

"तेथेच गड्या, राहि अुभा क्षणभरी तरी
जन नयन मधुर रुचिर वदन पाहुं दे हरी. ध्रु०
बघ टाकुं नको अेकहि रे पुढति पाअुला,
नच घेअि तिळहि पाठीशीं तेंवि त्या जला,
मुळि अिकडे ना तिकडे ना वळविं दृष्टिला;
रे स्थिरनयनें स्थिरचरणें स्थिरपणा धरीं." १ (टेथा ३/१३६)

'वैशाखमासिं' (किग्र ४५२), आणि 'प्रीतीस पात्र०' (किग्र ४६५) या पद्यांत कडव्यांतील अन्त्य चरण निराळ्या म्हणजे धवलचन्द्रिका मात्रावलीचा असल्याने त्यांची जाति वेगळी होअून ती विषमजातींत पडते (पुढे कामना पहा).

६५ 'धवलचन्द्रिका' [।भृ।भृ।भृ।+]

(१) "धन्य दिवस आज साधुसङ्ग लाधला!
सर्वहि शुभयोग पर्वकाळ साधला." (गोव-पस २/३०३)

(२) "धवलचन्द्रिकाच काय पूर्ण साचली,
सत्पुण्य अथवा जलरूप पावली!
स्फटिक शिलामन्दिर हें काय भूमिचें,
कीं द्रवलें विमल हास्य चन्द्रमौलिचें,
विरघळले शुभ्र मेघ काय शारदिंचे,
कीं निर्मळ साधुमनें सकळ वितळलीं!" (देशाप ४/२)

गोव-पस (२/३०५), श्रीपाद कृष्ण कोल्हटकरकृत 'महाराष्ट्रगीत,' गोविन्दाग्रजकृत 'निद्रागीत' (गोग्रा ३८), आणि अुपाध्येकृत 'बाळ' (अुपो २३) अित्यादि कविता या धवलचन्द्रिकाजातींत आहेत. आपल्या 'गोमान्तक'

काव्यांत घावत्या दीर्घ रचनेसाठीं या जातीचा अुपयोग महाराष्ट्रभाट विनायकराव सावरकर यांनी करून दाखवून तीस नवें महत्त्व प्राप्त करून दिलें आहे. तथापि ही जाति नवीन आणि स्वकृत आहे अशा समजुतीनें त्यांनी तिला वैनायक असें जें नाव दिलें आहे तें योग्य नाही. 'नोहे हा जवन पवन' (देमू ५५) या पद्याच्या कल्पनाची घटना वेगळी असल्यानें तें या धवलचन्द्रिकाजातींत धरूं शकत नाही.

६६ 'जीवनलहरी' [।भ्र।भ्र]

(१) "अदय हृदय समज नरा
शमन शमन शमन शमन. ध्रु०
अुतराया भवजलधी
वासना समूळ वधीं,
क्षणभरही विषयिं कधी
रम न, रम न, रम न, रम न." १ (साक ६५)

(२) "एक करीं मधुर्गीतें
हात तुझा अन्य करीं
शीळ निशा वाजवितें
चन्द्रकला डोअिवरी,
पर्णावर अर्धफुल
वाऱ्यांतुनि गन्ध हले,
स्वर्ग कुठे ? स्वर्ग कुठे ?" (कुजी)

कुसुमाग्रजकृत जीवनलहरी हें काव्य समग्र आणि 'अन्तरङ्ग अुघडतांना' (पाषि १) हीं या जातींत आहेत.

कडाका हा अेका कटिबन्धासारखाच धावता पद्यप्रकार आहे. कटाव पद्मावर्तनी असतो तर कडाका हा भृङ्गावर्तनी दिसतो. यमकें चरणान्तच असतात असें नव्हे. तीं चरणादिकहि असतात.

"कृष्णगीत गात गात समाधिस्थ अुमा राहि, शुभाचरणसहित सर्व सुमापर्णे आवरोनि नभामधे अुमारिला" अित्यादि (अक ९) पद्य.

६७ 'विनोद' [–।– ∪ – ∪ ।+]

" जातां अता कशाला ?
आलांत मग कशाला ?
ही जाळपोळ करुनी
जातां कसे पळोनी ?
हृदयांतल्या हिन्याला
जा ठेवुनी हवाला.
कां लागलात जाया ?
केला विनोद राया !
मीतूपणा निमाला,
रागावलो कुणाला ? "( घा-मधुमा २३ )

६८ 'रसना' [–।– ∪ – ∪ ।–+, –।– ∪ – ∪ ।–+]

" रसने न राघवाच्या थोडी यशात गोडी. ध्रु०
निन्दास्तुती जनांच्या, वार्ता वधूधनांच्या,
सोड्य व्यथा मनाच्या, काही न मांत जोडी. "
( मोस्फुका ४/२०६ )

पृ. २११ वर अनुराग या वृत्ताखाली दिलेलीं अुदाहरणें पहावीत.

६९ कामदा [।– ∪ – ∪ ।+॥– ∪ – ∪ ।+]

" कृष्णवस्त्र हें मयद पेशुनी
अखिल विश्वही स्यात झाकुनी
रमणिसङ्गमा हृदयिं अुत्सुक
जाय अष्टमी-कुमुदनायक. " ( तासक ८ )

ही 'मार्गप्रतीक्षा' नामक कविता सबन्ध या कामदाजातींत आहे. ज्या वृत्ताला कामदा हें नाव केल्या केप्ता देतात त्याला मन्दारमरन्दचम्पूकाराने दिलेलं मधुलिका हें नाव निश्चित केलेलें आहे.

७० दिण्डी दोन मीटा ( ∪ – – – ) वा पुष्प ( – ∪ – – )
या गणांच्या मध्ये अेक रगण वा तगण घातल्याने दिण्डीचा चरण सिद्ध होतो.

अन्त्य आणि अुपान्त्य हीं अक्षरें गुरु हवींत; अितरत्र अेका गुरूच्या ठिकाणीं दोन लघू चालतात.

(१) घोष अैका 'ग्यानबा तुकाराम!'
राअुळाची ही वाट सुखाराम!
गूढ भक्तांची दाखवीत लीला
पहा दिण्डी चालली पण्ढरीला. (२६१)

(२) "मणी पडिला दाढेसि मकरतोण्डीं
सुखें हस्तेंची काढवेल प्रौढीं;
परी मूर्खाचें चित्त बोधवेना
दुधीं कूर्माच्या पाळवेल सेना." (तुकाराम पृ. २/५८८)

हें ४२८० वें पद्य द्वादशपदी आहे. वणीकर गोविन्दकवींचें 'काय सांगूं सौन्दर्य मानवींचें' (पद्म २/२९२) आणि आनन्दतनयकृत पूतनावधांतील 'कथा अैके कल्याण कौरवेशा' आणि 'देव जाणे हा भाव सखे माझा' आणि पुढील पद्यहि हीं सारीं दिण्डी जातीचीं आहेत. भुवाल्यानांतील दिण्ड्यांची रचना शिथिल आहे परन्तु अेरव्ही अितकें यान्वेसुद लिहिणाऱ्या रघुनाथपण्डिताच्या दमयन्तीस्वयंवरांतील दिण्ड्यांची रचना शिथिल असावी याचें मात्र आश्चर्य वाटतें.

(३) "रामनामाची गती कोण जाणे?
जाणताती कैलासपती राणे. ध्रु०
किटकपक्ष्यादी मोक्षपदा जाती
तेथ अितरांची कोण कथा गा ती?

* * *

मन्त्र माझ्या शिकविला मायबापें,
म्हणे गेलीं आनन्दतनय पापें."

सर्वसङ्ग्रह मासिकांतील पदसङ्ग्रह (१/४)

४ हरावर्तनी

७१ 'किङ्किणी' [।– – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ ]
७२ 'अविनाशी' [।– – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ]
७३ 'दन्तरुचि' [।– ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – + ]
७४ 'वरमङ्गला' [।– ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – ]
७५ 'सुरमन्दिर' [।– ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – ]
७६ 'वीणावती' [। ⏑ – – । ⏑ – – । ⏑ – – । ⏑ – ]

७१ 'किङ्किणी' [।– – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ ]

(१) " पायजलद्देहिं प जललव मुअंतेहिं
दढकढिणपविवलय परिवद्धदन्तेहिं
रणझणिय मणिकिङ्किणीसोहमाणेहिं
अणवरयपरियलिय करडमलदाणेहिं " (णुमा ७/१३/१)

णायकुमारचरिउ या प्राकृत काव्यांत ७ वा सन्धि, १३ वें कडवें, ९ वा सन्धि, २० वें कडवें हीं या जातींत आहेत.

(२) " सुरला दिवस अल्प, पोटें थकुनि चूर
पथ रानि चढणींत, पर राहिले दूर. ध्रु०
असशील घरिं आज, तू गे बघत वाट,
प्राण स्तनयनांत, पोटांत काहूर " । १ (तासक २०४)

७२ 'अविनाशि' [।– – ⏑ । – – ⏑ । – – ⏑ । – – ]

" अविनाशि सुख तें ऽ मज पावयला
प्रभु दीअ तर शोक करुं मी कशाला !
स्वर्गी नसे दुस्तर, मरणाचि वाता
परि प्रीति सुरसानि प्रभुची मलाला." (सुम ६१९)

७३ 'दन्तरुचि' } [।– ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – ⏑ ⏑ – । – – ]

" यदसि यदि किञ्चिदपि दन्तरुचिकौमुदी हरति दरतिमिरमतिघोरम्
स्फुरदधरसीधवे तवपदनचन्द्रमा रोचयति लोचनचकोरम्

सत्यमेवासि यदि सुदति मयि कोपिनी देहि खरनखरशरघातम्
घटय भुजबन्धनं जनय रदखण्डनं येन वा भवति सुखजातम् ”

हा ( गीगो १९ वा ) सवन्ध प्रबन्ध या दन्तरुचिजातींत आहे.

७४ ‘वरमङ्गला’ [ – ᵕ – | – ᵕ – | – ᵕ – | – ᵕ – ]

वरमङ्गला हें नांव ज्या प्राचीन प्राकृत पद्यावरून दिलें आहे तें पद्य मागे ( पृ. २१-२२ वर ) दिलेंच आहे. येथे काही अेकीकडेला पडलेलीं अुदाहरणें देतों.

( १ ) “ विकचकर्णोत्पलस्पर्धितरलेक्षणाः
केलितालक्षणत्कनकमयकङ्कणाः
सरसनखराजिविच्छुरितभुजमण्डलाः
काश्चिकोलाहलवशादर्शितोरुस्थलाः ” * ( सोय १/१५-१६ )

( २ ) “ या भविष्यांचिया दिव्य कारागिरा
कोण रोधील ? दे कोण कर सागरा ? ध्रु०
शूल राजा, तुझा रक्त त्यांचें पिवो,
गृध्रगण भक्षण्या पुण्यगात्रां शिवो,
दुर्गे त्यांचीं दिरें अधम कुणि लोम्बवो,
अन्त समजूं नको हा नृपा पामरा ! ” १ ( तासक १५८ )

गीतगोविन्दांतील १३ वा प्रबन्ध, ‘ हिन्दमू बाञ्छिते० ’ ( गोक २४ ), रेन्दाळकरकृत ‘ अमृतसरिता जिथे गर्जती अुसळती ’ हें पद्य, ‘ पूर्णाहुति ’ ( तासक २०३ ) आणि ‘ रोहिणीस ’ ( पारा १०३ ) हीं या वरमङ्गलाजातींत आहेत.

७५ ‘सुरमन्दिर’ [ | – ᵕ – | – ᵕ – ]

“ अतुल तव कृति अति भ्रमवि मति अीश्वरा ! ध्रु०
वर्षती मेघजल

* हें पद्य गद्य समजून गद्यासारखें छापलेलें आहे. परन्तु हें अेक नवीन प्रकारचें पण पद्यच आहे हें Dr. A. Venkatasubbiya यांनी प्रकाशित केलें. वस्तुतः हा पद्यप्रकार नवीन नाही.

शान्तविति भूमितल
सलिल मग त्यजुनि मल
जात सुरमन्दिरा" ( गोवा १ )

'वधूवरयोः शुभं भवतु!' ( तासक १८९ ) ही कविता याच जातींत आहे.

७६ 'वीणावती' [ |ᴗ––|ᴗ––|ᴗ––|ᴗ– ]

"घुमे नाद तो सुन्दरीच्या करीं
मनीं अन्तरींही विराल्या परी
तदा हृदयिंच्या सर्व तारा स्वरें
म्हणूं लागल्या गान अेकस्वरें–
म्हणोनी करीं शान्त झाली गती
विचारान्तरीं लीन वीणावती,
तिने शुधळितां नादरत्नाकरा
मनोवृत्ति सान्यादि आल्या भरा." ( गोवा १९६ )

कोल्हटकरांचें 'कपोला कपोलाचि अीच्या सरी' हें पद या वीणावती-जातींचेंच आहे.

धर्म २ रा

अर्धसम जाति

१ पद्मावर्तनी

७७ 'तामसी' { [ –|प|प|प|प|–+ ]
[ –|प|प|–+ ]

७८ 'विजयिनी' { [ –|प|प|प|प|–+ ]
[ –|–++ऽᴗ|+ ]

७९ 'मणिहार' { [ –|प|प|प|प|ᴗ+ ]
[ –|प|प|प|ᴗ+ ]

८० "कुसुमवती" { [ |प|प|–+ ]
[ |प|प|प|प|–+ ]

८१ 'मन्मथसुन्दर' { [ |प|प|प|––+ ]
[ |प|प|प|प ]

८२ 'सदामण्डिता' {[।प।प] [।प।प।प।−−+]}

८३ 'सीमारेषा' {[।प।प।प।−−+] [।प।−−+]}

८४ 'हरिपद' {[।प।प।प।+ऽ⌣+] [।प।−+]}

८५ 'विहङ्गमाला' {[।−−+ऽ⌣।+] [।प।प।प।+ऽ⌣+]}

८६ 'श्रीरङ्ग' {[−।प।प।प।−+] [−।प।प।−+]}

८७ "विपचपक" {[−।प।प।−+] [−।प।प।−+, −+।−+]}

८८ 'मदनमञ्जरी' {[−।प।प।प।−+] [−।प।−+]}

८९ 'रत्नमाला' {[।प।प।प।+] [।प।प।प।−+]}

९० 'माया' {[−−।प।−+] [।प।प।प।−+]}

९१ "रक्षा" {[।प।प।प।−+] [।प।−+]}

९२ "गगनचपला" {[।प।−+] [।प।प।प।−+]}

९३ 'जन्मभू' {[−।प।प।प।⌣+] [−।प।−+ऽऽ−।प।⌣+]}

९४ 'मुद्रिका' {[−।प।प।⌣+] [−।प।−+ऽऽ−।प।⌣+]}

९५ 'तर्कयुक्ति' {[−।प।प।प।⌣+] [।प।प।प।⌣+]}

९६ 'स्वर्गदारिका' {[।प।⌣+, ध्रु।प।⌣+] [−।प।प।प।⌣+]}

९७ 'सवत्सा' { [ श्रु | प | ⏑ + ]<br>[ − | प | प | प | ⏑ + ]

९८ 'राजेश्वरी' { [ प | ⏑ +, श्रु | प | ⏑ + ]<br>[ | प | प | प | ⏑ + ]

९९ "रणरङ्गा" { [ | प | प | ]<br>[ | प | प | प | ⏑ + ]

१०० 'केशवकरुणी' { [ | प | प | प | ⏑ + ]<br>[ श्रु | प | ⏑ + ]

१०१ 'जीवनध्वनि' { [ श्रु | प | ⏑ + ]<br>[ | प | प | प | ⏑ + ]

१०२ 'जानकी' { [ | प | प | प | ⏑ + ]<br>[ − | प | ⏑ + ]

१०३ 'यदु' { [ − | प | ⏑ + ]<br>[ | प | प | प | ⏑ + ]

१०४ 'सत्कीर्ति' { [ | प | प | प | ⏑ + ]<br>[ | प | ⏑ + ]

१०५ 'नन्दनन्दन' { [ | प | ⏑ + ]<br>[ | प | प | प | ⏑ + ]

१०६ 'नवतरुणी' { [ | प | +, श्रु | प | + ]<br>[ − | प | प | प | + ]

१०७ 'शरण' { [ − | प | प | प | + ]<br>[ − | प | + ]

१०८ 'पाठिका' { [ − − | + ऽ ⏑ + ऽ ऽ | + ]<br>[ − | प | प | + ऽ ⏑ + ऽ ऽ | + ]

१०९ 'सुन्दरयादव' { [ प | +, श्रु | प | + ]<br>[ | प | प | प | + ]

११० 'स्वतन्त्र' { [ | प | प | प | + ]<br>[ | प | +, श्रु | प | + ]

१११ 'बन्धु' { [ | प | प ]<br>[ | प | प | प | + ]

७८ 'विजयिनी' { [–।प।प।प।प।–+] खण्डित
[–।–+ऽ–॰।+]

"तळहातीं टेकुनी ही स्वशिरातें बैसली! ध्रु०
मस्तकीं केश विखुरले, श्वास चालले, अश्रु
लोटले, गळे जळ खालीं,
चिन्तेने पोळली.
होती ती सिंहासनीं भाग्यशालिनी धनी
विजयिनी परी तिज खाली
दुर्दैवें ओढिली." (विक ८)

'विरही' (विक १०५) आणि 'प्रभुराया धाव' (सुरा ४०६) या कविता याच विजयिनीजातींत आहेत.

७९ 'मणिहार' { [–।प।प।प।प।॰+]
[–।प।प।प।॰+] कमललोचना

"चट क्षुठावल्या घनघटा, पडति पटपटा बिन्दु,
कटितटासि बळकट धरा.
आता पूर नद्यासि भरपूर येईल मग शूर
कसा येतो घरा!
हा पवन भयङ्कर, भुवनसख्याविण अवन
कोण करि, पवनघनाहुनि बरा
ही शङ्का मज भयकम्पा देति, कुणि सम्पा–
दणि तरि करा.
किति सञ्चित हिनमति वञ्चित मज गडे
किञ्चित् सुख नये दिसत्
अतिसुन्दर तनु, कुच मन्दरगिरिसम, कुन्द–
रदन काय असत्
अहि मण्डित तनु केली खण्डित पति पुढ
धुण्डित बसला रुसत्!

अकलङ्कित कुल, मन शङ्कित, केलि तनु
अङ्कित मन्मथ कुसुम.
'मणिहार' सकल तनुभार, विकल संसार, करिल कोण
पार! कठिण साकडें!
किति चिन्ता करं भगवन्ता मनामधिं! सन्तापुनि
येतें रडें!" (राग ५६)

८० "कुसुमवती" { [।प।प।--+] चंद्रमणि
[।प।प।प।प।--+] कपिवीर

"या वेलीवर फुललें मोहक फूल,
कुणि छाट्यावें प्रभुमस्तकिं हें जाइल, अथवा
होय तिथेंच मलूल!
हा पडलेला दिसतो फत्तर काळा,
कुणि घाट्यावें पडतिल कण्ठीं माळा, किंवा
खापा नित्य कपाळा!" (मनोरंजन–आग्र २१/२/१४)

८१ 'मन्मथसुन्दर' { [प।प।प।--+] हरिभगिनी
[।प।प।प।प] मनहरिणी

"मन्मथसुन्दर चिन्मय माधव सन्मतिमोहन नीलतनू
ही रतिरञ्जन, कीरगिरा, नवनीरजनेत्र सुगाकृति केली
सत्य सनातन नित्यनिरञ्जन कौस्तुभकन्धर लोकमती
पीनकुचा, सपुर्णमनुकम्पनल मानवती अभिमान नव्हाळी,
तो स्मर, हे रति, तो घन हे विज, तो तरुनायक हींच लता,
मानवरूप, पावनल होवुनि अनन्दनन्दन मन्दिर माळी." (भालव ८२ पं)

वरील आलो नांव प्रणित करायचें असल्याने अन्यचरणांत भेद पडला आहे. नाहींतर हें मंदार आणि हेमरूपा मिळून होणाऱ्या अर्धसमवृत्ताचेंच उदाहरण झालें असतें.

८२ 'सदामण्डिता' { [।प।प] पादाकुलक
[।प।प।प।--+] हरिभगिनी

" ब्रिटॅनिये जय ब्रिटॅनिये ! ध्रु०
जगदीशाची तू प्रिय मारी
तोच दयाघन तव कैवारी, तूंहि तयाला यश विनवें. १
किती सङ्कटें आलीं गेलीं,
सोपानासम तीं तुज झालीं, सदामण्डिता तू विजयें. २" (टिक २२२)

भा. रा. ग्रोकिल यांची 'प्रेमा नलगे मुळि कारण तें' (माल ५२) ही कविता या सदामण्डिताजातींतच आहे.

८३ 'सीमारेषा' { [।प।प।प।--+] हरिभगिनी
[।प।--+] अचलगति

(१) " विमपटावर रम्याकृतिच्या सीमारेषा परोपरी
रङ्गु कधी यठतील परी !" (गोवा ७८)

(२) " वसन्तांतली फुलली वेली पल्लवपाणीं बृक्ष धरी
वठुनी झाला दीन जरी.
सहस्रकर रवि नको, कुमुदिनी हासे बघुनी चन्द्राला
भुरली अेक कला ज्याला." (कुमार-रमा सप्टें० १९२६)

'काही अिङ्ग्रजी कविता वाचून' (गोवा ७६) आणि 'कां !' (गोवा २२९), 'परक्या देशांतील रहस्या' (अशाक १३२) या कविता या सीमारेषाजातींत आहेत.

८४ 'हरिपद' { [।प।प।प।+ऽ॰+] प्रियलोचना
[।प।-+] शुद्धसती

" हरिपदकमलीं निवास या ऽऽ करिं मम सतत मना रे ! ध्रु०
धन मिळवाया झिजवुनि काया शेवटिं वदशी 'हाय !' रे
सेवुनि धनिकजना रे. १
परवनितेशीं लम्पट होशी, दद्ग तुझे हे काय रे !
जाशिल यमसदना रे." २ (खाक ६५)

८५ ‘विहङ्गमाला’ { [।--+ऽ॰।+]
[।प।प।प।+ऽ॰+] प्रियलोचना

" सुमना डोल रे
विहङ्गमाला चित्तविनोदा काढिल मग मधु बोल रे.” (टेआ २/७१)

८६ ‘श्रीरङ्गा’ { [-।प।प।प।-+] भवानी खण्डित
[-।प।प।-+] भूपति

(१) " श्रीरङ्गा गोपिकोत्सङ्ग धरुनि करि रङ्ग
हरी हा याओ !
कुञ्जांत मातला वसन्त साङ्गूं काओ !” (राला ८४)

(२) " कामिनी हंसगामिनी कि सौदामिनी
चमकती व्योमीं,
सखिवृन्द जाति वारुळा गात आरामीं.
लाअुनी अुटण, न्हाअुनी, केस अुदसुनी
गुम्फुनी वेणी
मुद, चन्द्रकोर, केवडा, फुलांची श्रेणी.
सावरुन् मस्तकावरुन् पदर करीं धरुन्
चालतां झोकें
स्मरध्वजा गोल नारळी पाठिवर फडके.
श्रीरङ्गापदाब्जीं दङ्ग पन्त कविभृङ्ग
गुअतो रामीं—
सखिवृन्द जाति वारुळा गात आरामीं.”

(वि. सो. खरवंडे वाग्विहार १२९)

‘हे मना सोड कल्पना’ (किम २२६), ‘सुकुमार अगुनि तू पार’ (किम ५७३), माधवानुजकृत ‘पर्वती’ (गानुक २९) अित्यादि कविता या श्रीरङ्ग जातींत आहेत, ‘मला वाप मिळालें आहे !’ (टिक १०२) या पद्यांत समचरण केव्हा केव्हा [-।प।प।+] असे आहेत.

८७ "विपचपक" { [−|प|प|−+] भूपति / [−|प|प|−+,−−|−+] भवानी }

श्रीरङ्गजातीच्या व्यत्ययानें ही विपचपकजाति सिद्ध होते. समचरणांत तिसऱ्या आवर्तनाच्या मध्यावरच शेवटें खण्डन असतें.

"टाकिला पिशुनि अेकदा विपाचा प्याला
प्रीतिचा, तुझ्या हातचा; मीपणा गेला, त्वन्मय झाला.
आन्घळा दाण्डगा बाळीं! मम विश्वास
चढविलें तुला वर देवच तू मम खासड्या समयास."
(घा—मधुमा १०)

या लावणींतील अितर द्विपद्यांतील समचरणांत दोन दोन मात्रा शून्य आहेत.

८८ 'मदनमञ्जरी' { [−|प|प|प|−+] भवानी / [−|प|−+] शुद्ध }

(१) "ही कामाची तल्वार करिल ज्या वार ठार तो समजा
नव मदनमञ्जरी अुमजा." (देमू ५४)

(२) "न्हुकडे ढगांच्या माळा,
अुभि दरडीवर ती बाला. ध्रु०
वायुची बसे थाप ती, चिरगुटें अुडति, केस भुरभुरती,
कां चढली दरडीवरती!" १ (तासक १५५)

ताम्बेकृत 'जगाहुन भिन्न' (तासक ५) आणि कुमारयशोदकृत 'आवाहन' 'गोड वेड' (कुयदो ४, ५१) या कविता मदनमञ्जरीजातींत आहेत.

८९ 'रत्नमाला' { [|प|प|प|+] चन्द्रकान्त / [|प|प|प|−+] लवङ्गलता }

(१) "येअी कविबाला भेटाया रसिकाला. ध्रु०
अिन्दु वितरि तिज रुचिर कान्ति निज, अुदधि रत्नमाला,
सुगन्ध अर्पी फुलें सुगन्धित, मारुत दावि पथाला."
(टे—आमा जुलै १९२८)

(२) "ब्रह्माण्ड व्यापुनि उरला, तो हा धर्मसखा अपुला. ध्रु०
ज्या वृक्षाचें मूळ रोविलें शेषशिरावरती
शेवट जाओ भेदुनि गगना, शेषभाग या जगतीं." १(टेआ ३/९२)

९० 'माया' { [‒‒।प।‒+] / [।प।प।प।‒+] } लवङ्गलता

"माया मला भ्रमविते वाया
दया करा, तुजवीण कोण मज अन्य क्षम ताराया !
छाया स्वकृपेची गणराया,
दीन लीन या दासावर कर, पोटीं घे अन्याया.
पायीं अर्पण केली काया
ध्यान तुझें मानसा लागलें, अन्य सुचे न जना या." (विक १२८)

गोविन्दकविकृत "कोठे जासी राष्ट्रप्राणा !" (गोक ३०), आणि 'अपमानिता' (तासक १९०) या कविता या मायाजातींत आहेत.

९१ "रक्षा" { [।प।प।प।‒+] लवङ्गलता / [।प।‒+] शुद्धसती }

"येथि कशाला दारीं
औसा औन दुपारीं ! ध्रु०
भीक हवी जरि झोळि रिती परि दिसते कां तरि सारी !
रीत दिसे तव न्यारी !
हुकलें लक्ष्यत, नेओ गल्यत परमुलुखा व्यापारी,
भगवी व्यर्थ किनारी.
राखेन्चे घर वसुनि जिव्हावर ठिणगी जी पिचणारी,
फुङ्कर तिजसि न मारी." (यग ७०)

९२ "गगनचपला" { [।प।‒+] शुद्धसती / [।प।प।प।‒+] लवङ्गलता }

रक्षाजातीच्या व्यत्यासाने गगनचपलाजाति सिद्ध होते.

(१) चपला गगनीं सुरली
तनमन लागुनि प्राण वेधले चन्द्रज्योत जरि सुटली." (प्रक १९५)

'ध्यान तुझें दिनरजनी' या चरणानें आरम्भित होणारी ही लावणी गगन-चपलाजातींत आहे.

(२) "सा विरहे तव दीना
माधव मनसिजविशिखभयादिव भावनया त्वयि लीना"

हें गीतगोविन्दांतील ८ व्या प्रबन्धाचें ध्रुवपद तेवढें या संयुक्तमात्रावलीचें आहे.

९३ 'जन्मभू' {[−।प।प।प।⌣+] कमललोचना
[−।प।++ऽऽ−।प।⌣+]

या द्विपदींतील दुसरा चरण मुख्यत्वें पुढील म्हणजे मुद्रिकाजातींत आढळतो. तो [−।प।−+] आणि [−।प।⌣+] अशा दोन मात्रावली मिळून होतो. मधला दोन मात्रांचा काल १४ व्या मात्रेवर न घेतां बहुधा १२व्या मात्रेवर घेण्यांत येतो. तसें करावयाचें असेल तरच ११ वी नि १२ वी मात्रा मिळून गुरु अक्षर असावें लागतें.

"मा सान्जफेरि अुरकुनी डोङ्गरावरी निमुट बैसलों,
जन्मभूकडे पाहूनी —० अस्वस्थ क्षणि जाहलों.
मातींत रोखिले नयन तरल होअून आर्द्र जाहले,
त्रिमटींत दिपळ घेवोनी —० वर नभाकडे फेकिले!'
(आ-किमा, जा १९३१)

९४ 'मुद्रिका' {[−।प।प।⌣+] लीलापति
[−।प।++ऽऽ−।प।⌣+]

या जातीला नाव 'मुद्रिके राम टाकूनि अलिस तू कशी?' या अत्यन्त शिथिल अशा स्त्रीगीतावरून पडलें आहे. हें पद्य जिज्ञासूंस, खण्डेराव विनायक पुरंदरे यांनी प्रकाशित केलेलें 'स्त्रियांचीं गाणीं' या पुस्तकांत २४ व्या पृष्ठावर सापडेल. आधुनिक मराठी कवितेंत या जातींत गाणीं रचायला आरम्भ ताम्बे यांच्या 'तू हुबेहूब साअुली त्याच मूर्तिची' या सरस कवितेच्या प्रसिद्धीपासून झाला.

(१) "तू हुबेहूब साअुली त्याच मूर्तिची—
हरपली दिवङ्ग्यात झाली —० जी मूर्ति साअुली तिची." (ताग्रक ८९)

या कवितेंत अन्तरा नाही; पण [ – । प । ⏑ + ] या मात्रावलीचा अन्तरा घातल्याने रमणीयता वाढते.

(२) तू लावण्याची सखे, पुष्पवाटिका—
"ही स्तुति समजूं का टीका–० ही प्रेमचातुनीति का ?"
कोकिळाच गमशी, गळा तुझा चाङ्गला—
"का सूचवितां मग माझा–० हासुनी वर्ण सावळा !
निर्दोष अहां का स्वता
मम दोष म्हणुन सुचवितां !"—
मी येरें कलङ्कित चन्द्र नि तू चन्द्रिका.
ही प्रेमखूण पटली का !–० घालुं दे स्वर्ण-मुद्रिका !" (२६२)

'वियोगिनीचें पुष्पस्मरण' (गिका ७६) ही कविता अशी अन्तऱ्यासह आहे.

९५ 'तर्कयुक्ति' { [ – । प । प । प । ⏑ + ] कमललोचना
{ [ । प । प । प । ⏑ + ] समुदितमदना

"हा जरठकुमारीविवाह शास्त्रें अधमाधम मानिती
नरकपात निश्चयें घडवि तो, तर्कयुक्ति शिकविती." (देशा १२).

९६ 'स्वर्गदारिका' { [ । प । ⏑ +, शु । प । ⏑ + ] सूर्यकला
{ [ – । प । प । प । ⏑ + ] कमललोचना

"अहा अुषासुन्दरी पातली, अहा अुषासुन्दरी
ही स्वर्गदारिका मुखाशि दावित आली अवनीवरी.
दूरी तिमिरावली दवडुनी दूरी तिमिरावली
ही आङ्गिरसांची राणी दावित मार्गा सरसावली.
अयि अुषे देवते नमीं अम्हां जागवीं,
दे साह्य सम्पदा जिङ्कायाला नवी.
अुदार दे वैभवा मनुजवरि, अुदार दे वैभवा,
जें वैभव अमुचें होअिल देवी नवल सदा मानवां"
(माद–सदे १४/६)

पण या पद्यांत शिथिलता आहे. काही द्विपद्या नवतरुणीच्या आहेत.

९७ "सवत्सा" { [ग्रु | प | ᴗ + ] पर्वती
{ [ – | प | प | प | ᴗ + ] कमललोचना

"बघा ती पवळी मज हिणवितें,
माझ्याच देखतां वत्साला ती रोज रोज पाजितें;
काढिल्या रङ्गोळ्या अङ्गणीं
पाहुनि येतां प्रियकर हासे आनन्दाने मनीं." (सोची)

९८ 'राजेश्वरी' { [ | प | ᴗ +, ग्रु | प | ᴗ + ] सूर्यकला
{ [ | प | प | प | ᴗ + ] समुदितमदना

(१) "रामकृष्ण नरहरी, विठोबा रामकृष्ण नरहरी!
कधि रे कधि रे कधि रे डोळां दाखविशिल पण्ढरी!
(माधव-पत्र ३/४७३)

(२) "दावि मला श्रीहरी सखये, दावि मला श्रीहरी
ललितें नमितें तव पदपङ्कज, दया करी मजवरी. ध्रु०
पातळ हें चन्दिरी सखये, पातळ हें चन्दिरी
गाढे न लागे बाझि, मला गे कञ्चुकि ही भरजरी.
न रुचे कण्ठीं सरी सखये, न रुचे कण्ठीं सरी,
मुदराखडिचा भार होतसे, साजणि माझ्या शिरीं." (खाक ८२)

(३) "दूर दिसे टेकडी जेथुनी सर्व घेतसे बुडी;
राङ्गा पऱ्यांची तेथे राही सदासर्वदा खडी.
बाग तिथे मोहरे, हिण्डती रङ्गित फुलपाखरें;
परागांत रङ्गल्या पऱ्यांचें रूप किती साजिरें!
महाल मोठा मला पऱ्यांनी रमणीसत्व बान्धिला,
शोभा त्याची पाहुनि चित्तीं चन्द्रहि वेडावला.
फुलपाकळ्यावरी दवाच्या चकचकती झालरी,
आणि झोपली मधे पऱ्यांची सुन्दर राजेश्वरी." (गोत)

'विपस' (६) आणि सुदासकृत 'काव्याच्या पडार्थ' (दाम ३२) या कविताहि या राजेश्वरीजातींत आहेत.

९९ "रणरङ्गा" { [ । प । प ] पादाकुलक
[ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना

" चल, निशाण धर हें करीं, पुढे चल नेटाने वरिवरी. ध्रु०
युद्ध माजलें चहुंबाजूला
वीराला प्रतिवीरहि भिडला, श्रुठली दङ्गल खरी. १
समशेरींची खणखण चाले,
तुटती भाल्यावरती भाले, चमकुनि विजलीपरी. " २
(गिका ४५)

१०० 'केशवकरणी' { [ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना
[ श्रु । प । ‿ + ] पर्वती

या जातीचें नाव रामजोशीकृत 'केशवकरणी अद्भुत लीला नारायण तो कसा' (शाला ११) या पद्यावरून दिलें आहे.

(१) " भक्तासाठी तो जगजेठी बसून माल्यावर
पाखरें श्रुडवी शारङ्गधर " (तुका-पद्य १/१३७)

हें पद्य अधिक श्रुनें आहे. 'शल्या वसन्तवाता' (दक १९) 'आलिङ्गन' (रेफ १/४७), 'वालकवीचें गायन' (माक ५७), 'पाटिल' (पाय ८), 'जिवलगेच्या हृदयासाठी' (पाय ४५) अित्यादि कवितांत अन्तरा नाही. बहुशः [ – । प । प । ‿ + ] या लीलारतिमात्रावलीचा अन्तरा असतो. याचें श्रुदाहरण मागे ३३८ व्या पृष्ठावर दिलेंच आहे.

१०१ 'जीवनध्वनि' { [ श्रु । प । ‿ + ] पर्वती
[ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना

केशवकरणीच्या व्यत्ययाने जीवनध्वनिजाति सिद्ध होते.

" खळखळे प्रीतीची वाहिनी
चहूंकडे मधुमञ्जुळ निघतो कसा जीवनध्वनी !
रडति कां तूच्च गान सद्गुनी !
ये धुवुनी गङ्गेंत वाहत्या हात तूंहि रङ्गुनी. " (तासक १२१)

'दास्यविमोचन' (श्रुय २१९), 'हृदयपरीक्षा' (पवि १०४), आणि

'कळी खुडणारास'—( पपि १०६ ) या कविता जीवनध्वनिजातीच्याच आहेत. मात्र विषम चरणांतील आद्यतालकपूर्व गण उलटून पुढे ढकलिला आहे.

"बापा करुणाकरा अीश्वरा
हा माझा तू म्हणशि जयाला धन्य मनुज तो खरा."

ही द्विपदी वस्तुतः

"अीश्वरा बापा करुणाकरा
हा माझा तू म्हणशि जयाला धन्य मनुज तो खरा"

अशीच आहे.

१०२ 'जानकी' { [ |प|प|प|⏑+ ] समुदितमदना
[ –|प|⏑+ ] भरतखण्ड

(१) "स्वहित पाहिजे तरि तुज सखया अेक सांगतों मती,
स्मर राम जानकी-पती." (विपस ६४ वें)

(२) "बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडिघडी,
अयि न ये फिरुनि कधि घडी.
किति हौसेने टाकिलि असती स्यांत मागुती अुडी,
परि दुबळी मानवकुडी." (देशा २२)

(३) "स्वयंवराच्या समयीं पाहुनि रामर्मूति सावळी
किति लाज मला वाटली !" (मामाह-कथ २/११७)

१०३ 'यदु' { [ –|प|⏑+ ] भरतखण्ड
[ |प|प|प|⏑+ ] समुदितमदना

जानकी जातीचा व्यत्यय पुढील अेकुलत्या अेक पद्यांत पहायला मिळतो:—

"यदु घालुनिया धनुवरी
सरसर रररर बाण सोडितां गिळिले रजनीचरीं." (पाग)

१०४ 'सत्कीर्ति' { [ |प|प|प|⏑+ ] समुदितमदना
[ |प|–+ ]

"अकपट होअुनि थोरल्हाना समदृष्टीने भजा,
अन्यायपथें न जा.

सदसद्विचार करुनी लोकीं सत्कीर्तीनें सजा,
द्या कोणा नच अिजा.
सत्यवचन राखण्यास न टळा, कथितों या हितगुजा,
व्हा सावध, नच निजा." (अनन्त फन्दी.)

या जातीचा व्यत्यय म्हणजे पुढील पद्याची नन्दनन्दनजाति होय.

१०५ 'नन्दनन्दन' { [।प।∨+] / [।प।प।प।∨+] समुदितमदना

(१) "नन्दाच्या नन्दना
नवनीरदतनु कोमलगात्रा दानवकुलकन्दना." (देक २९)

(२) "हृदयसागरामधी
कुणी लोटिली आशानौका समजणार हें कधी!
नर्मांत घनदाट या
कुठुनि वरें हा किरण धावतो! कोण धाडितें तया!"
(मस-रमा ७/११)

ना. धों. ताम्हनकर यांची 'यत्रना' (र्‍हीमा ७७ वा) ही कविता या नन्द-नन्दनजातींत आहे.

१०६ 'नवतरुणी' { [।प।+, श्रु।प।+] चन्द्रकला / [−।प।प।प।+] अरुणप्रभा

या जातीचें नाव 'मालिण नवतरुणी' या पद्यावरून ठेविलें आहे. 'तरुण कुलिन गोरा' हें शारदेंतील पद, 'सृष्टीची करमणुकीची घटका' (टिक ५४) 'प्रियकर हिन्दीस्तान' (टिक २२१), 'देशिं असें वरदान' (श्रुग २६१ वें) 'वसन्तकाल' (सुमौ ९९) अित्यादि पद्यें याच जातीचीं आहेत. अन्तरा बहुशः [−।प।प।∨+] या मात्रावलीचा असतो; पण पुढील पद्यांत तो भूरतिमात्रावलीचा आहे.

"अजुनि किती निजशी-सुन्दरा, अजुनि किती निजशी!
ही प्रभात झाली तरी पुरेशी होय न झोप कशी?

हा प्रभातवायू मन्द सुशीतल वाहे,
चहुंकडे अुषेचें हास्य मधनिया राहे,
अूठ नेत्र अुघडीं–सुन्दरा, अूठ नेत्र अुघडी,
शुभ शान्तिरसाची निरमङ्गलमय आहे हीच घडी." (रेक १/२१३)

१०७ 'शरण' {[–|प|प|प|+] अरुणप्रभा
[–|प|+] सिंहनाद

"वद जाअुं कुणाला शरण करी जो हरण सङ्कटाचें,
मी धरिन चरण त्याचे.
बहु आप्तबन्धु बान्धवां प्रार्थिलें कथुनि दुक्ख मनिंचें,
तें होय विफल सारें." (किम ४८५)

१०८ 'चञ्चिका' {[––|+ऽ॰+ऽऽ|+]
[–|प|प|+ऽ॰+ऽऽ|+]

(१) तुजविण शान्ति नाही
जीवनज्योति गे स्नेहाविण तव राहिना ही.
मलती केलि कां ही!
आलिङ्गुनि तरुला सखि बघ खेळे चञ्चिका ही! (२६१)

(२) "अम्हि होअुं। धाऽगन्याऽऽग
अम्हि। वाजूं छुम्‌छुम्। येतां तुम्ही। नाऽचण्या ऽऽग
अम्हि होअुं। वऽञ्चिकाऽऽग
अम्हि। हासूं खुदकन्। या तुम्हि कलिका। तोऽडण्याऽऽग."
(माअ २२)

१०९ 'सुन्दरयादव' {[|प|+, थु|प|+] चन्द्रकला
[|प|प|प|+] चन्द्रकान्त

(१) "झडकरि आणा हो–०सुन्दरयादव राणा हो,
पञ्चप्राण व्याकुळ झाले हरिविण आणा हो." (केस्वा–पस ११४८६)

(२) "माया जळली का!–० तिळही ममता नाही का!
आली पोटीं पोर अेकटी तीही विकतां का!" (देया ६५)

(२) " मङ्गल नाम तुझें की
मज शुचारू दे की
तार करें या लोकीं
दास अनन्त कृपाघन अिच्छित रह्याणि येअुनि दे की." (अपश ११ वें)

'अन्तर माझें साधें' (जोसवि–यमा ५९/१) हें पद्य या गयाजातीचें आहे.

२०० 'नारी' {[।प।–+] शुद्धसती दोन वा अधिक
{[।प।प।प।+] चन्द्रकान्त अेक

" अपराधाविण पतिला
छळितां आनन्दाला
मानुनि निष्कारण कोपाला वाढविती नारी." १ (किम्र ६००)

हें पद्य समग्र या प्रकारचें आहे.

२०१ 'शशिकुल' {[।प।–+] शुद्धसती दोन वा अधिक
{[।प।प।–+] वंशमणि अेक

" शशिकुलभूषण सदया
मत्प्राणेश्वर विजया
विनवी ही तवजाया मान्य कराया." (किम्र ४७०)

या पद्याच्या चार कडव्यांपैकी दुसरें तेवढें शिथिल आहे.

खालील सात जातींच्या कडव्यांत [अु।प।◡+] या पर्वतीमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२०२ 'धरणी' {[अु।प।◡+] दोन वा अधिक
{[अु।–+, ऽऽ–।प।प।प।◡+] अेक

२०३ 'कण्टकदरी' {[अु।प।◡+] दोन वा अधिक
{[–।प।प।प।◡+] अेक

२०४ "स्वर्गसौन्दर्य" {[अु।प।◡+] दोन वा अधिक
{[।प।प।प।◡+] अेक

२०५ 'निस्सार' {[अु।प।◡+] दोन वा अधिक
{[।प।+, अु।प।+] अेक

२०६ 'स्वर्गसुख' {[श्रु | प | ॰ +] दोन वा अधिक
{[– | प | प | – +] अेक वा दोन

२०७ 'स्वरसुधा' {[श्रु | प | ॰ +] दोन वा अधिक
{[श्रु | – +, ऽऽ – | प | – +] अेक

२०८ 'कालचक्र', {[श्रु | प | ॰ +] दोन वा अधिक
{[– | प | प | ॰ +] अेक वा दोन

२०९ 'सुरमणि' {[श्रु | प | ॰ +] दोन वा अधिक
{[– – | ॰ + ऽ – – | +] अेक

२१० "विविधरसा" {[– | प | प | ॰ +] अेक
{[श्रु | प | ॰ +]

२११ "सुभद्रावर" {[– – | प | + ऽ ॰] दोन वा अधिक
{[– – | + ऽ ॰ – – | +] अेक

२०२ धरणी { [श्रु | प | ॰ +] पर्वती दोन वा अधिक
{ [श्रु | – +, ऽऽ – | प | प | प | ॰ +] अेक

"पाहलं ग दारीं–॰ का हसूनि खुदकन् तरी ? ध्रु॰
काल दुपारीं विहिरीवरी
होति अेकटी तू सामुरी
पाणी प्याया आलों परी
तोंच सुकुमारी–॰ पाण्याची घरची तुझिया करवी
पडली धरणीवरी" (सोनी–मुगी ११)

येथें कडव्यांतील पहिले तीन चरण [श्रु | प | ॰ +] असें न वाटतां [| प | – – ॰ +] असें दिसतात; पण तसें ते घेतल्यास आणि म्हटल्यास पुढील चरणाच्या आरम्भी अेकच मात्रेच्या आघातलकपूर्व गणाची कूच पडते; आणि तो गण तर पाच मात्रांचा आहे. मग छन्दोभङ्ग होतो. तो टाळायचा असला तर कडव्याचे पहिले चरण [श्रु | प | ॰ +] असेच पाहिजेत.

२०३ 'कष्टकदुरी' { [श्रु | प | ॰ +] पर्वती दोन वा अधिक
{ [– | प | प | प | ॰ +] कमललोचना अेक

" हां हां जाअुं नको या वरी,
असती जाण सर्वही अरी,
करितिल कुदशा तव सत्वरी,
मन्दिर नोहे, 'कण्टकदरी !'
कुणि म्हणे मित्र, ' ये खाली, ये तू सुटशिल येथुनि तरी !" ( सुमी १०८)

येथे पहिले चरण [ अु । प । ᵕ + ] या मात्रावलीचे घेता येत असल्याने छन्दोभङ्ग होत नाही. पण

" पडलों बन्दीच्या मी घरीं
भुयार खाली, माडी वरी,
वाटा दोनचि जर यापरी
काय करूं त्या ठायीं तरी ?
घर जाअूं अथवा खाली अुतरूं, संताप हा अन्तरीं." १ (सुमी १०७)

येथे कडव्याचे आरम्भीचे चरण [ । प । – – ᵕ + ] असे आहेत आणि अन्त्य चरणाच्या आरम्भीं दोन मात्रांचा आघातालकपूर्व गण आहे. तेव्हा साम्यावर अेक मात्रा अधिक होअून छन्दोभङ्ग होतो.

केशवसुतकृत ' कोणीकडून !–कोणीकडे ! ' ( केक १४३ ) या कवितेलाहि ही चर्चा लागू आहे. मात्र त्या कवितेंत कडव्याचा अन्त्य चरण आवृद्ध म्हणजे [ – । प । प । ᵕ + ] या मात्रावलीचा असल्याने त्याची जाति निराळी होते. ( खाली २०८ कालचक्रजाति पहा. )

२०४ "स्वर्गसौन्दर्य" { [ अु । प । ᵕ + ] पर्वती दोन या अधिक
[ । प । प । प । ᵕ + ] समुदितमदना अेक }

" नवलाख तुळे रुदकर – ० तळपे माळ घरच्यावर. ध्रु०
दिसतें अेकच वर अम्बर,
खाली सैन्याचा सागर,
नाही नजर ठरत त्यावर,
जरिपटका डौलांत डोलतो भरजरि हत्तीवर.
हौदा सोन्याचा सुन्दर,

वरती मोत्यांची झालर;
माथ्‌ – दक्षिणचा भास्कर,
स्वर्गाचें सौन्दर्य लोटलें ह्या तर सैन्यावर. " (अशा ६८)

२०५ 'निस्सार' { [अु।प।⌣+] पर्वती दोन वा अधिक
{ [।प।+, अु।प।+] चन्द्रकला अेक

" निस्सार असे संसार्‌ सखे, पण अम्हां कधी कळणार्‌ ! ध्रु०
पहा या श्रावणमासांतले
रवींचे किरण कसे कोवळे
ढगांतुन खुले, क्षणीं मावळे—
तसा असे संसार्‌ मनीं पण केव्हा हें ठसणार्‌ ! " (घाली ३१)

२०६ 'स्वर्गसुख' { [अु।प।⌣+] पर्वती दोन वा अधिक
{ [–।प।प।–+] भूपति अेक वा दोन

"कोणी बालक अङ्कावरी
घेअी जो जो जो त्या करीं;
आलापी मञ्जुळ स्वरें गायना हर्षें,
ती गानमिषें त्यावरी सुधेतें वर्षें. १
कोणी बालक घेअी कडे
जावळ ज्याचें भुरु भुरु अुडे,
बोबडें बोल्नडे वदे, अकारण हासे,
पाहतां त्यापुढे तुच्छ स्वर्गसुख भासे. " २ (विक ११९)

२०७ 'स्वरसुधा' { [अु।प।⌣+] पर्वती दोन वा अधिक
{ [अु।–+SS–।प।⌣+] अेक

गळ्यातुनि काढिशि जी स्वरसुधा
हरी ती मनिंच्या सान्या क्षुधा,
आणखी चिन्ता —० लोपती क्षण न लागतां. १
रेशमी रङ्गवल्लिका भरी
चतुरा कुणी मख्मलीवरी
त्यापरी गाणें —० मज वाटे तव शोभते. २ (२६९)

२०८ 'कालचक्र' { [अु।प।ᵕ+] पवंती दोन या अधिक
[–।प।प।ᵕ+] लीलारति अेक या दोन }

(१) "फिरतें कालचक्र भूवरी,
दसरा ये प्रतिसंवत्सरीं,
पूर्वजस्मरण आम्हांस देतसे परी
सोडवे न धामग्राम राहिलें दुरी." (विक ८५)

'दसरा' (विक ८४) ही कविता १ लें कडवें वगळल्यास शेवटपर्यन्त याच कालचक्रजातींत आहे. 'निन्दिलें आजवर वैरि गणियलें तुला' ही सोपानदेव चौधरीकृत कविता (सपा १/३६) या कालचक्रजातींतच आहे. के. नारखेडे यांच्या 'न्याहारी' आणि 'जीवनमूर्ति' (नाच १५, २५) आणि विश्वनाथ वामन पत्की यांची 'प्रतीक्षा' या कविता समग्र या कालचक्रजातींत आहेत.

(२) "कोणीकडून ? कोणीकडे ?
अिकडुनि तिकडे, म्हणती गडे;
येथुनि तेथे, मागुनि पुढे,
हें तर नित्यच कानीं पडे;
पण समाधान का कधी तयाने घडे ! (केक १४३)

(३) "नयतिच्या वदनामधि यालिका
करुनी साज तन्द्रेचा निका
चालली लवचणा कोठे अभिसारिका ?
कोणता राजहंस मानसी,
हुरहुरे व्यास वधाया असी !
किति दौलदार घारस्य हें हिच्या नसीं !" (माजूल ९५)

'माझा अभिसार' (पा-मधुमा ५) 'कज्जली' (माजूल ७२) नि 'अभिसारिका' (माजूल ९५) या कवितांत पद्मकल्याणी आणि कालचक्र या दोन जातींचें मिश्रण आहे.

२०९ 'सुरमणि' { [––।प।ᵕ+] दोन या अधिक
[––।ᵕ+ऽ, ––।+] अेक }

(१) "असें बोलुनिया सुरमणी
झाला विन्मुख हो तत्क्षणीं
विट्ठल पन्त कवीचा धणी
१ मन्द स्वनीं ऽ रडुं लागे." (विदप ४०)

हें अन्त्य कडवें आहे. याच पद्यांतील अितर कडवीं निराळ्या म्हणजे सुभद्रावरजातीचीं आहेत.

(२) "अूऽठ अूऽठ माझ्या जिया
वन्दुनि दिनरजनीच्या धवा
आयुर्मार्गी आक्रम नवा
कर गौरवा ऽ देवाच्या.' १ (अुव ५)

अन्त्यचरणांत पहिल्या आवर्तनाच्या आरम्भीं अितर चरणांतील अन्त्य गणाप्रमाणें म्हणजे ( ∪ + ऽ ) अशी अक्षररचना न करितां दोन्ही गुरु (--) अशीहि करितात.

(३) "प्रातःकाळीं वन्दूं तुला
देवा, विश्वेशा, मङ्गला
पापा शरणागतवत्सला
प्रेमान्धीला आनन्दें." १ (अुव ४)

ही 'सकाळची प्रार्थना' सर्वथा या प्रकारची आहे.

२१० "विविधरसा" { [-।प।प।∪+] लीलारति अेक
[अु।प।∪+] पर्वती दोन वा अधिक

"तुम्हि लिहा सुकविता अशी विविधरसा रसीं
हृदयें आकर्षुनि घे तशी
सहज जी रुचे रसिकमानसीं. १
जी वधतां हृदयें मुदें डुलुनि जन वदे
कविस या प्रसन्न तू शारदे
म्हणूनिच रचितो सुन्दर पदें." २
द. वा. पद्माकर (प्रप ४०)

या पद्यांत [-।प।प।∪+] हा अन्त्यचरण आधीं घेअून [अु।प।

⌣ + ] या मात्रावलीचे दोन चरण मागाहून घालून कडवें सिद्ध करण्यांत आलें आहे. हा कालचक्रजातीचा व्यत्यय गमतीचा आहे.

२११ "सुभद्रावर" { [ – – । प । + ऽ ⌣ ] दोन वा अधिक
[ – – । + ऽ ⌣ – – । + ] अेक

ही जाति मागील सुरमणिजातीसारखीच आहे. भेद अितकाच की सुरमणि-जातींत कडव्याच्या पहिल्या तीन चरणान्तीं आणि चौथ्या चरणांतील पहिल्या आवर्तनाच्या आरम्भीं ( ⌣ + ) हा त्रिमात्रक गण येतो तर सुभद्रावर जातींतल्या त्या ठिकाणीं ( + ⌣ ) हा त्रिमात्रक गण येतो.

( १ ) " धर्मा यालि न कुणि तुजला
आता अुरला रे ! ध्रु०
नाहि तपा तुज कोणी नाथ,
हरवे सरस्वतीचा कान्त,
सत्या, होय तुझाही घात,
झाला अऽस्त सौजन्या." ( देशाप ४० )

( २ ) " मजला वरिल सुभद्रा काय
कुणितरि सांगा हो ! ध्रु०
आहे लग्नाची मनिं आस
कैसा घ्यावा हो संन्यास ?
दिसतिल दाही दिशा अुदास,
होअिल त्राऽस शरिराला." ( अे–पस १/४५ )

या अेकनाथाच्या पदासारखेंच त्याचें ' माझा कृष्ण देखिला काय ' ( अेक-नाथ गाथा ६९५ ) हें पद आहे. दत्तकृत 'मेनका शकुन्तलेस काय म्हणते ?' ( दक ३२ ) ही कविता या सुभद्रावरजातींत आहे. परन्तु त्या कवितेंत मध्येच अेखादा चरण [ – – । प । + ⌣ ] असा न होतां [ । प । – – + ⌣ ] असा होतो.

" या परि समजावित कवळून
। शकुन्तलेसी । जगताहून

गेली जननी वर घेअून
गगनांतून वीज जशी." ( दक ३२ )

(१८५) 'नगरभूषण' { [अु | प | ∽ + ] दोन वा अधिक
[ | प | + ]

अुदाहरण मागे पृ. ४६९–४७० यांवर दिलेंच आहे.

खालील सहा जातींच्या कडव्यांत [ – | प | ∽ + ] या भरतखण्डमात्रावलीचें अभ्रेसत्वर असतें.

२१२ 'घनराजी' { [ – | प | ∽ + ] अनेक
[ – | प | प | प | ∽ + ] अेक

२१३ "राक्षी" { [ – | प | ∽ + ] अनेक
[ – | प | – + ऽऽ – | प | ∽ + ] अेक

२१४ 'श्रीपति { [ – | प | ∽ + ] अनेक
[ | प | प | प | ∽ + ] अेक

२१५ 'सम्पन्न' { [ – | प | ∽ + ] अनेक
[ – | प | प | प | + ] अेक

२१६ 'सुवासिनी' { [ – | प | ∽ + ] अनेक
[ – | प | प | – + ] अेक

२१७ 'गङ्गा' { [ – | प | ∽ + ] अनेक
[ – | प | प | ∽ + ] अेक

२१८ 'माधुरी' { [ | प | ∽ + ] अनेक
[ | प | प | प | ∽ + ] अेक

२१२ 'घनराजी' { [ – | प | ∽ + ] भरतखण्ड दोन वा अधिक
[ – प | प | प | ∽ + ] कमललोचना अेक वा दोन

( १ ) "यापरी असे जीवनऽसखे गे, चञ्चल अमुचे क्षण ! ध्रु०
घनराजिमधे कवडसा
तरु हलतां डुलतो कसा,
परि जाअि कुणिकडे सांड्ग सखे, रवि कलतां स्थानांतुन ?
यापरी असे जीवनऽसखे, अग्नि हलतों डुलतों पण."१ (तासक २८)

(२) "तारका चमकली नभीं,
तेजाची पुतळी अुभी,
रिपुतिमिर तयास्थ न भी,
अुत्साह वाढता तिचा अहाछ परिसर अुज्ज्वल करी." (यवि-त ७७)

(३) "ते हवेत माझे मला, सखे परि भवति सदा गल्बला. ध्रु०
हे मधुप फुलांभोवती
डोलती जसे गुञ्जती
लोभले तेवि सोबती, तयांचा ओघ न कधि आटला." (यमा ४८)

'भिङ्गरी' (देनाथ-सुगी ९३), 'तुज म्हणूं कुणासारखी' (काचा ६०), 'पत्तलमीति' (कान ४२), 'विनयवती प्रियेस' (रमा-कभा ४८) आणि 'आला खुशींत समिन्दर' हें 'कोळ्याचें गाणें' (काचा ५५) या कविता या घनराजीजातींत आहेत. गिरीशकृत शूर्पणखा ही सुप्रसिद्ध कविता या चालीवर म्हणता येत असली तरी ती या जातीची नाही. ती कविता फडक्याची घटना पाहतां भरतखण्डजातीची ठरते.

२१३ 'राधी' { [-।प।∪+] भरतखण्ड दोन वा अधिक
[-।प।-+, SS-।प।∪+]

"भर अुन्हामधी चालुनी
आलीस घारपारणी
येशील कवा ही राणी -० होतांच वाट पाहुनी." (टो-स्फूमा ३७)

२१४ 'श्रीपति' { [-।प।∪+] भरतखण्ड दोन वा अधिक
[।प।प।प।∪+] समुदितमदना अेक

(१) "पतिव्रता द्रौपदी सती
ती सभेमाजि गुणवती
दुःशासन दुर्जनें गाञ्जितां आळविते श्रीपती." (मिद्रो-स्काभा १/१११)

(२) "या रानचमेलीवरी
दडलेल्या पर्णान्तरीं
शोधुनी फुलें हासरीं
हार तयांचा कुणासाठि तू गुम्फिसि तीरावरी?" (जोव २१)

'सवाओी माधवरावांचा मृत्यु' (माक १६३), 'पर्वती' (अशा ७९), 'सिंहगडास पाहून' (वासा–अकामा ४/१२०), 'स्वप्नांत काय पाहिलें' (पाआ २४) अित्यादि कविता या अंशपातिजातींत आहेत.

२१५ 'सम्पन्न' { [–।प।⏑+] भरतखण्ड दोन वा अधिक; [–।प।प।प।+] अरुणप्रभा अेक }

"अुमलत्या फुला, साङ्गतों तुला धरुं नको वृथा अभिमान. ध्रु०
सम्पन्न बगीचा खुला
हा तुजभवती पसरला,
कमतरता नाही जला,
सौन्दर्य खुलावें तुझें म्हणोनी प्रयत्न सगळे जाण." (कास्फु ८९)

२१६ 'सुवासिनी' { [–।प।⏑+] भरतखण्ड दोन वा अधिक; [–।प।प।–+] भूपति अेक }

(१) "घेअि हरिनाम–० मनवाजिस घाल लगाम. ध्रु०
त्यज पुत्रमित्रराग तो,
तुज गुज मी हें साङ्गतों,
श्रीकान्तभजनिं लागतो अल्पहि न दाम." (खाक ७०)

(२) "या मूर्तदेवता पहा भरतभूवरती. ध्रु०
पति जिवन्त असतां स्त्रिया
वरि सुवासिनी पद जयां
वैधव्यें पुशितां तयां चढविलें वरती." (पापना–माअक २७)

काव्यविहारींची 'कृष्णेच्या पुलावरून' (कास्फु ९७) ही कविता या वासिनीजातींत आहे.

२१७ 'गङ्गा' { [–।प।⏑+] भरतखण्ड दोन वा अधिक; [–।प।प।⏑+] लीलारति अेक वा दोन }

(१) "तू मर्द कोठल्या गडी ?
हे तुझेच का सवगडी ?

चल टाक हिच्यामधि हिमतीने तू अुडी
जंरि अयाड्ग भरली गड्गा ही दोथडी."
(टे-आमा सप्टे १९२३)

परन्तु या कवितेंत आणि 'हा कोण' (टे–विवी ४४) या कवितेंत मेघा जातीच्या कडव्यांचें मिश्रण आहे.

(२) "रावलों वृथा संसारसौख्यविभ्रमीं
ने प्रभो आपुल्या धामीं–० जाहलों सर्वथा श्रमी. ध्रु०
चाललों जरी सत्पथें
तरी तुफान अुलटें सुटे,
हैराट तार्ठ भडकतें, विफल दस्तुमी." (यश १५६)

'विनवणी' (अशा ६३) आणि शेखरकृत 'सुश्रिप्रेम' (कभा ५९) या कविता या जातीच्या आहेत. ध्रुवपद मुद्रिकाजातीचें असलें तरी कडव्यांची घटना भिन्न असल्याने या पद्यांची जाति मुद्रिका होअू शकत नाही.

२१८ 'माधुरी' { [।प।-+] दोन या अधिक
[।प।प।प।-+] समुदितमदना अेक

(१) "गोड जाअिच्या फुला, सदा मी जीव तुला वाहिला. ध्रु०
जरी अुकिरड्यावरी
घाण पडे चौफरी
तया सन्निधीं परी
वेल जाअिचा चढे तयावरि जन्म तुझा जाहला. १

अुपवनात किति तरी
जाअी-फुलें गोजिरीं
सदैव पसरतीं तरी
तुझ्या गुणांची गोड माधुरी लळा लाविते मला." २ (कास्फू १९)

खालील तीन जातींच्या कडव्यात [अु।प।+] या भुवनसुन्दर मात्रावलीचें अभेदत्व आहे.

२१९ 'कल्पद्रुम' { [अु।प।+] अनेक
[।प।प।प।+, अु।प।+] अेक

२२० 'चेतना' {[ अु । प । + ] अनेक
{[ – । प । प । प । + ] अेक

२२१ 'विकल्प' {[ अु । प । + ] अनेक
{[ । प । प । प । + ] अेक

२२२ 'भृङ्गराजी' {[ । प । प । प । + ] अेक
{[ अु । प । + ] अनेक

२११ 'फल्पद्रुम' {[ अु । प । + ] भुवनसुन्दर दोन वा अधिक
{[ । प । प । प । +, अु । प + ] अेक संयुक्त

"वस्तुनि पुष्पकिं शङ्कर हा,
जन हो भवि निःशङ्क रहा. ध्रु०
कारण पुष्पचि सृष्टीला
यघतां दिसतें दृष्टीला
पुष्पाविण फल वृक्षाला
नाही मासे हें सकलां.
निःसार्थकता पूजेला
पुष्पाविण कीं प्रिय त्याला
म्हणुनि यसशुनी प्रथम पुष्पकीं करिति महोत्सव हा,
भका कल्पद्रुमसम हा." ( किप्र ७७ )

'शशिकुलभूषण गुणवन्ता' ( किप्र ३६५ ), 'माझी ताओ' (टिक १२०), 'दिघलें जनन तुला असलें' ( रेक १/३५७ ), 'शुराही दंववाप्पा टाळी' ( नाव १२ ) अित्यादि कविता या कल्पद्रुमजातींत आहेत.

२२० 'चेतना' {[ अु । प । + ] भुवनसुन्दर दोन वा अधिक
{[ – । प । प । प । + ] अरुणप्रभा अेक

"माझिया शूर सैनिकांनो,
धुरन्धर मर्द मराठ्यांनो,
शत्रुच्या कर्दनकाळांनो,
साण्डुनी प्रसङ्गीं प्राणहि भगवा झेण्डा राखावा!

निशाणा बघुनि अघाडीला
स्फुरण ये अवघ्या सेनेला
शत्रुशी झुन्ज करायाला
चेतना मूर्त ही सङ्ग्रामाची वाऱ्यावरि झुल्वा." (कास्फू १०१)

२२१ 'विकल्प' { [अु । प । +] भुवनसुन्दर दोन वा अधिक
[ । प । प । प । +] चन्द्रकान्त अेक वा दोन

(१) "मम सुत भरत जरी असला
प्रिय नच रामाहुनि मजला;
मिळतें राज्य जरी त्याला
अत्यानन्दचि मज झाला.
खचित मन्थरे, शुद्धपर्णी भ्रम ये तव बुद्धीला
म्हणुनि असा हा विकल्प वाटे देहिं तुझ्या शिरला." (किम ५७५)

(२) "हे घन चूर्ण पहा होती,
बारिक रेणूपरि दिसती,
रथाच्या मागे ते अुडती,
धरांत दुसरी पङ्क्ति अरांची दिसत चक्रवेगें." (देविक)

'रुतला दर्भाङ्कुर चरणीं' (किम ३४७) हें पद्य आणि परशुराम नारायण पाटणकर यांची 'विश्वनाटक' (सुद्रा १५२) ही कविता हीं या विकल्पजातींत आहेत.

२२२ 'भृङ्गाराजी' { [ । प । प । प । +] चन्द्रकान्त अेक
[अु । प । +] भुवनसुन्दर दोन वा अधिक

विकल्पजातीच्या व्यत्ययाने ही जाति सिद्ध होते.

"प्रभातकालीं मोटवणावर कोण गीत गाअी,
साथही कोण त्यास देअी,
चला ती बघुं या नवलाअी! २

अनुपम शोभा दावितसे ही आम्रवृक्षराजी
फुलांची नवाळ ती ताजी,
झुडुनि ती अुडति भृङ्गाराजी." २ (कास्फू ७६)

खालील तीन जातींच्या कडव्यांत या [।प।+] पिराङ्गमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२३ 'चिरसुन्दरी' {[।प।+] अनेक<br>[।प।प।प।५+] अेक

२२४ 'कालवेग' {[।प।+] अनेक<br>[।प।प।प।+] अेक

२२५ 'कण्हेरी' {[।प।+] अनेक<br>[।प।−−+] अेक वा दोन

२२३ 'चिरसुन्दरी' {[।प।+] पिराङ्ग दोन वा अधिक<br>[।प।प।प।५+] समुदितमदना अेक वा दोन

" सदींचें छकुलें
सुमन जरी सुकलें
दरवळलेला परिमळ घुलवित ते हृदया बरिवरी.
दुर्दैवें अपुला
वियोग जरि घडला,
तुजविषयींचे तरङ्ग हृदयीं वसतिल चिरसुन्दरी." (कावि २१)

'सान्त्वन' (कावि २३) या कवितेच्या पहिल्या कडव्यात तेवढा थोडा भेद आहे.

२२४ 'कालवेग' {[।प।+] पिराङ्ग दोन वा अधिक<br>[।प।प।प।+] चन्द्रकान्त अेक

" प्रीतींची फुलली
हृदयाची धरिली
कलिका, परि ती कालवेगें जाअिल का सुकुनी !" (अफु ७)

'भवितव्य (अफु ७) या कवितेच्या पहिल्या कडव्यांत मात्र थोडा भेद आहे.

२२५ 'कण्हेरी' {[।प।+] पिराङ्ग दोन वा अधिक<br>[।प।−−+] अचलगति अेक वा दोन

" कळ्या कण्हेरीच्या
अन्तीं निधनाच्या
अुपयोगीं तुज पडतील,
शोभा तुज त्या देतील. " ( आगका–रमा ३/४ )

खालील दोन जातींच्या कडव्यांत पद्ममात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२६ 'गानतुषार' { [ | प ] अनेक
{ [ | प | प | प | + ] अेक

२२७ " नभोरङ्ग " { [ | प ] अनेक
{ [ | प | – – + ] अेक वा दोन

२२८ " मुक्तामाला " { [ | – – + ] अनेक
{ [ | प | – – + ] अेक वा दोन

२२६ 'गानतुषार' { [ | प ] दोन वा अधिक
{ [ | प | प | प | + ] चन्द्रकान्त अेक

अरुण तेज तव
लाजनसे नव
कपोल वैभव
प्रखर होअुनी जगता दिपविल रविरूपाने ते।
फेक मोचती
तेजोमय ती
काव्यस्फूर्ती
कविच्या हृदया अुसळवि, अुधळी गान तुषारांतें " (देवि–विवी १४०)

२२७ " नभोरङ्ग " { [ | प ] दोन वा अधिक
{ [ | प | – – + ] अचलगति अेक वा दोन

" चला गड्यांनो खेळूं या
आनन्दाने नाचूं या. ध्रु०
आभाळाचे
तऱ्हे तऱ्हेचे
रङ्ग मजेचे

चला चला रे पाहूं या
आनन्दाने नाचूं या." ( नावा ९ )

२२८ "मुक्तामाला" { [ – – + ऽऽ ] दोन वा अधिक
{ [ । प । – – + ] अचलगति तीन

( १ ) " तुझ्या गळां
माझ्या गळां
गुम्फूं मोत्याच्या माळा"
" ताओ, आणखि कोणाला ?"
" चल रे, दादा चहाटला।"
" कशी कशी
आज अशी
गम्मत ताओची खाशी !"
" आता गडि फू दादाशी ?"
" तर मग गट्टी कोणाशी ?" २ ( तात्तक ८३ )

पण या पद्याची रचना बरीच शिथिल आहे.

खालील तीन जातींच्या कडव्यांत [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] या मात्रा-वलीचें अग्रेसरत्व आहे.

२२९ 'घोररजनी' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] अनेक
{ [ – । प । प । प । – + ] अेक

२३० 'मनमोहन' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] अनेक
{ [ – । प । प । प । + ] अेक

२३१ 'सन्देश' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] अनेक
{ [ – । प । – +, ऽऽ – । – + ऽ – ᵕ । + ] अेक

२२९ 'घोररजनी' { [ । – ᵕ – + । – ᵕ – + ] दोन वा अधिक
{ [ – । प । प । प । – + ] मवानी अेक

"शारदिग सारखी तव याजदुनी टाकी मन गुङ्गवुनी. ध्रु०
घोर रजनी विकट हासे,
यस्तुटायीं भूत भासे,
परि स्वर अैकतां दूर जातसे काहुर मनिचें पळुनी." ( मध १३१ )

'साल्गिरा' ( कुयशो १८ ), मञ्जुमाधवकृत 'गा गडे गोड गोड गीतांना' ( पद ४५ ) आणि सोपानदेव चौधरी यांची 'वाजवूं नको माधवा०' ( गोगु ७५ ) ही कविता या घोररजनीजातींत आहेत.

२३० 'मनमोहन' { [ ।–⏑––+।–⏑––+ ] दोन वा अधिक
{ [ –।प।प।प।+ ] अरुणप्रभा अेक

"मनमोहन वाजवुनी सारङ्गी काढी मञ्जुळ सूर्. ध्रु०
विश्व निजलें, शान्त झालें,
अेक धरणी मात्र डोले,
गम्भीरपणाने अन्धारांतुनि छेडित जाओी सूर्" १ ( गिका ३ )

'चान्दण्यांतील हुरहूर' ( माजूस्व ७० ), 'खचतो माझा धीर' ( मामा ५० ), 'श्वास व भास' ( मामा ५६ ), 'अेका बाळकास' ( गोदू ४ ), 'चिमुकल्यास' ( काचा ३६ ), कृष्णाकुमारकृत 'हुतात्मा' ( फ २२ ) अित्यादि अनेक कविता या मनमोहन जातींत आहेत.

२३१ 'सन्देश' { [ –⏑–+।–⏑–+ ] दोन वा अधिक
{ [ –।प।–+ऽऽ–।––+ऽ⏑।+ ] अेक

"हें स्वागत तुमचें सारें –० मज आता लाभतें. ध्रु०
हाय हो सन्देश माझा
नित्य हृदयीं यापवा जा !
जाअुं चा बन्दिशाळा ती – ० विरहाने कष्टते." ( अ–मे ११ )

२३२ 'रूपवती' { [ मोहिनी ] अनेक
{ [ शारदा ] अेक

"जरी कुणा श्रीमन्ताची सून होय शारदा
तरी त्यास साजे अैशी तिची रूपसम्पदा. ध्रु०
बघुनि तसि आकाशींची चान्दणी दिपावी,
नाहि रूपवन्ती दुसरी हजारांत ठावी,
हसत थोर सर्दारांनी मागणी करावी,
परी मला मनचे माण्डे खाउनि काय फायदा?" १ ( देशा ३१ )

खालील चार जातींच्या कडव्यांत घातीमात्रावलीचें अमेयत्व आहे.

२३३ 'सदयशान्त' { [⏓ ⏑ | ⏓ ⏑ | - - - + ] दोन वा अधिक
[⏓ ⏑ | ⏓ ⏑ - - - + | ⏓ ⏑ | ⏓ ⏑ | - - + ] }

(१) "सदयशान्त असशी मरणा, भीति तुझी वाटे ना. ध्रु०
हीन दीन दुःखी दुबळीं
ज्यांस ओस दुनिया सगळी,
येति त्यांस येशी जवळी प्रेम तुझें आटेना." (देशा ८७)

(२) "रुदन हेंचि आयुध अमुचें सर्वदा विजयी असे,
पाहतें तयाच्या पुढती मातृहृदय टिकतें कसें. ध्रु०
कोण ऐसि जाडी चिन्ता
स्वर्श मम न जी करि शान्ता
शल्य तें तिच्या हृदयान्ता कोणतें सलतें असे." (कोगु)

२३४ 'कृष्णनाथ' { [⏓ ⏑ | ⏓ ⏑ | - - - + ] दोन वा अधिक
[⏓ ⏑ | ⏓ ⏑ | - - - + | ⏓ ⏓ | ⏓ ⏑ | + ⏑ + ] }

"गोकुळिचा कान्हा कोणी पाहिला कि काय ग !
गोकुळिचा राणा माझा देखिला कि काय ग ! ध्रु०
प्रभू सावळा हा कृष्ण,
रङ्ग तुझा झाला कृष्ण,
कृष्णनाथ लपवुनि पोटीं ठेविला कि काय ग !" (छोका २१)

२३५ 'प्रेमरञ्जिता' { [⏓ ⏑ | ⏓ ⏑ | - - - + ] दोन वा अधिक
[⏓ ⏑ | ⏓ ⏑ | - - - + | ⏓ ⏑ | ⏓ ⏑ | + + ] }

(१) "काय पुरुष चळले बाजी,
ताल मुळीं धुरला नाहीं,
धर्मनीतिचार्ले पायीं तुडविती कसे हो !" (देशा २)

(२) "किती येळ साद्गू तुजला सोड हा अबोला ?
प्रेमरञ्जितांच्या साठीं वायदा कशाला ? ध्रु०

अपाङ्गास आली लाली
राग रङ्गलेला गालीं,
परी रागवोनी होओी फायदा कुणाला?" (जीअह-फत्रै २४/४)

रा. यशवन्त खण्डेराव कुळकर्णी यांची 'कोण ना भिकारी !' (माल १८) ही कविता या प्रेमरञ्जिताजातींत आहे.

२३६ 'आत्मवञ्चना' { [ ⏓ ⏑ | ⏓ ⏑ | – – – + ] दोन वा अधिक
{ [ ⏓ ⏑ | ⏓ ⏑ | – – – + | ⏓ ⏑ | ⏓ ⏑ | + ]

(१) "आकळे न अघटित घटना तव दयाघना,
की रुचे अधोगति अैशी या विभूतिंना ! ध्रु०
सिद्ध पुरुष सद्गुरु असुनी
मग्न होति मायाव्यसनीं
केंवि करिति तप नाशोनी आत्मवञ्चना" ! (गोटे—मामवो)

(२) "हे दिनेश, अुघडीं नयना तमनिवारणा,
तुजविना न अन्यचि कोणी क्षम जनावना. ध्रु०
कृष्ण घनचि अम्बरीं जमले,
लोकपतिस भ्रासूं सजले,
अुघड तरी द्वादशनयना लोकतारणा." १ (किरा—नजीमा २/९-१०)

अग्न्यावर्तनी

२३७ 'जलवाह' { [ | – ⏑ – – | – ⏑ – – ] दोन चरण
{ [ | – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – ] अेक

"हासतें जग हें विनोदें परि कुठे तू हे प्रभो !
नाचतें जग हें प्रमोदें परि कुठे तू हे प्रभो ! ध्रु०
तारकांसह चन्द्र चमके
फुल्लकुमुदीं वायु ठमके,
वाहती जलवाह गमकें, परि कुठे तू हे प्रभो !" १ (सुजी)

२३८ 'अमररमणी' { [ | – ⏑ – – | – ⏑ – ] दोन
{ [ | – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – – | – ⏑ – ] अेक

(१) " गमत सुखकर समय हा
तेजराशी कुमुदबान्धव येत सदनाङ्गणि पहा. ध्रु०
विपुधलल्ना भांवती
रत्नकन्दुक फेकिती,
अमररमणीपादतलहत म्हणुनि फिरे गगनिं हा." ( कावि २ )

(२) " यामिनी जणु कामिनी
यौवनीं मृदुहासिनी
मञ्जुमञ्जु सलील पाउलिं पावली जनमोहिनी." ( काराभ—माल ६७ )

भृङ्गावर्तनी

२३९ 'विजितमदन' { [ । भृ । भृ । भृ । — + ] परिलीना तीन
{ [ । भृ । भृ । भृ । भृ ] दाळी अेक

" श्रीराम माझा हो राजाधिराज ध्रु०
वीरासन पीतवसन सजलजलदकान्ती,
वामजानुनिहितवामहस्त मूर्त शान्ती,
ज्ञानमुद्रिका विराजमान दक्षिण हस्तीं,
अिन्दुवदन, सुगुणसदन, विजितमदन, विलसतसे ". ( विदप १२)

२४० 'कामना' { [ — । भृ । भृ । भृ । + ] रुचिरवदना दोन वा अधिक
{ [ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका अेक

" कां दिवसा तू करिशि विधो म्लान आनना ?
खुलवी तुज रात्रीचा समय, आन ना. ध्रु०
स्थिति माझीही तुजसमान होय या दिनीं,
मज बहु अुदास भयद खास गमत मेदिनी,
महतारायुत लोपे मम सुखद यामिनी,
लाभो तो, त्वरित घडो पूर्ण कामना." ( सुमौ ५८ )

'ग्रस्त मानसास' ( सुमौ २२ ) ही कविताहि या कामनाजातींतच अे
'वैशाखमासिं०' ( किम ४५२ ) या पद्याची हीच जाति आहे पण रच
थोडी शिथिल आहे.

" या जाळिजुशी मोगरिला बहर तो अला,
गुञ्जारव करण्यांत गुङ्ग मधुप जाहला,
नव पल्लव ते फुटतिं सकळ वृक्षगणांला,
कुसुमगन्धयुक्त मन्द वात सुटला." ( किम्र ४५२ )

२४१ 'हृदयहारी' { [ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका अनेक
[ । भृ । भृ । भृ । - + ] परिलीना अेक

" लपत छपत येअुनिया मारिशि पिचकारी,
भिजविशि का तनुलतिका कुटिला, मम सारी ? ध्रु०
केसांतुनि रङ्गाचे येम्ब निथळतां
पदर चिम्ब भिजुनि अुरीं तोवि चिलगतां,
विद्धलेली नजर तुझी मजशि विन्धतां
या परतें साङ्ग कुठे चित्र हृदयहारी." १ ( यग ५९ )

खालील सात जातींच्या कडव्यांत [ । भृ । भृ ] या जीवन लहरी मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२४२ 'रमावर' { [ । भृ । भृ ] अनेक
[ । भृ । भृ । भृ । भृ । भृ । + ] अेक

२४३ 'अुन्मनी' { [ । भृ । भृ ] अनेक
[ । भृ । भृ । भृ । + ऽऽ - । भृ । + ] संयुक्त अेक

२४४ 'हृदयवरद' { [ । भृ । भृ ] अनेक
[ । भृ । भृ । भृ । भृ । + ] अेक

२४५ 'मधुमधुरा' { [ । भृ । भृ ] अनेक
[ । भृ । भृ । भृ । भृ ] अेक

२४६ 'अरुण' { [ । भृ । भृ ] अनेक
[ । भृ । भृ । भृ । - ᵕ + ] अेक

२४७ 'शुभवदना' { [ । भृ । भृ ] अनेक
[ । भृ । भृ । भृ । - + ] अेक

२४८ 'पुण्डरीक' { [ । भृ । भृ ] अनेक
[ । भृ । भृ । भृ । + ] अेक

२४२ 'रमावर' {[ । मृ । मृ ] जीवनलहरी अनेक
{[ । मृ । मृ । मृ । मृ । मृ । + ] अेक

करि अति त्वरा
घडिघडिघडि पलपल जप अमृतधाम रामनाम धरुनि आदरा. ध्रु०
जो अिन्द्रियषट्क दक्ष
तो निजकल्याणदक्ष
त्यज वटवट खटपट अुगि, झटपट करि कपटरहित
भज रमावरा." ( विदप ३७ )

२४३ 'अुन्मनी' {[ । मृ । मृ ] जीवनलहरी अनेक
{[ । मृ । मृ । मृ । + ऽऽ – । मृ । + ] अेक संयुक्त

( १ ) "शाखांवरि झुडुप अेक,
पुष्प तयावरि सुरेख
पाहुनि मी निज हृदयीं मुदित जाहलों
त्याजवळि चाललों. १
जाअुनिया त्या सुमनीं
काय असे, हें स्वमनीं
मनन करित अुन्मन मी तेथ ठाकलों,
या पद्धिक बोललों." २ ( केक ११० )

'सत्य, दिव्य आणि शान्त' ( विक ४ ) आणि 'अर्धस्फुट पुष्पाप्रत' ( नाव १८ ) या कविता या अुन्मनीजातींत आहेत.

२४४ 'हृदयवरद' {[ । मृ । मृ ] जीवनलहरी अनेक
{[ । मृ । मृ । मृ । मृ + ] अेक

( १ ) "धणी – ० सकल तरणि–कुलज नृपति मुकुटमणी रे. ध्रु०
परम सदय हृदयवरद
दुरितजलधिपतितकरद
शतमुखमखविजयवरद खचर निकट पवनफणी रे. १

अमुर दनुज नमन मात्र
करुनि होय मव्य पात्र,
दारण आलियासि जो न पूर्वकर्म किमपि गणीरे." २
(मोरकेका १/३७०)

(२) " अर्थहीन गाली तू काहिही मुली!
होशीही तद्धिन किति सहज आपुली! ध्रु०
लाल जिभा चालवून
जें न अुकलि पण्डितगण
तें येथे ये समजुन ज्यास बालबोलि धुमगली." (अशा १२४)

२४५ 'मधुमधुरा' { [ ।भृ।भृ ] जीवनलहरी अनेक
[ ।भृ।भृ।भृ।भृ ] दासी अेक }

(१) " डोळे तुमचे जादुगिरी, आमुच्याकडे पाहुं नका! ध्रु०
तुम्हि जातां मुलखावरि
मारि चिन्ता कोण करी?
अेकलि मी राहुं कशी? फार दिवस लाधुं नका!"
(अेक प्राचीन पद्य, संहिता प्रतिभापाक्षिकावरून.)

(२) " लग्न नव्हे मरण अुद्या ठरलें तें टळत नाहि. ध्रु०
मातेची धरिलि कास,
परि तुटली तीहि आस;
नवस बोलिले जिवास, अजुनि कसा वळत नाहि!" (देशा ६१)

(३) " मधुमधुरा मुरलिधरा, आज असें काय गडे?
लाजुनि टक पघतां मुख! हाटॆत नव काय पडे? ध्रु०
नजर तरी जादुगिरी!
आवर, बेमान करी,
राहुं अुभी कोठवरी!
शिरिं घागर, मनिं खळबळ, न कळत पथिं चाल अडे." १
(गोपाश्रा-विवी ११)

'कञ्जनयन गोपाल' (विदप ३४), 'कमलनयन गोपाल' (विदप ३५) 'नन्दसुता ओळखितो०' (गोवो १३) आणि 'कालचा गुलाब कुठे' (कावा-३२) या कविता या मधुमधुरजातींत आहेत.

२४६ 'अरुण' {[।मृ।मृ] जीवनलहरी अनेक
{[।मृ।मृ।मृ।-∨+] मदनरङ्ग अेक

(१) "प्रिये पहा रात्रीचा समय सरुनि येत अुषःकाल हा. ध्रु०
चण्डगार वात सुटत,
दीपतेज मन्द होत,
दिग्वदनें स्वच्छ करित अरुण पसरि निज महा." १ (किम ५११)

(२) "अेकदाच पाहिलें,
पाहिलें तयाक्षणींच आपुली न राहिलें. ध्रु०
ठाअुकें न नांव-गांव,
कळतें केवि हृदयभाव ?
हें असें अधान्तरीं जिणें न जाय साहिलें." १ (अुपो ७)

(३) "सहज तुझी हालचाल मन्त्रें जणु मोहितें. ध्रु०
सहज चालणेंहि तुझें
सहज बोलणेंहि तुझें
सहज पाहणेंहि तुझें मोहनि मज पाळितें. १" (तासक १६८)

'जोहार' (विक ८१) 'मधुयामिनी' (याक २५), 'जगाचें गाणें' (गोवा ६०), 'पुनर्विकसन' (गोवा ७७), 'प्रीतीचा वास' (तासक ५८), 'साम्राज्यवादी' (तासक १८१) अित्यादि कविता या अरुण-जातींत आहेत.

(४) "नेत्र अुघडुनी
बघशि कुणा काय जनीं नेत्र अुघडुनी ? ध्रु०
चोहिकडे रम्यपणा
बघुनि तोषवीशि मना;
धर्शि मधुप, विर्शि अुडुप रुचिर स्राटे मानेनी." (टेआ १/१९४)

हें पद्यहि या अरुणजातीचेंच आहे. परन्तु 'भक्तजन सदा०' या पद्याच्या चालीवर लिहिलेल्या अशा पद्यांच्या कडव्याच्या अन्त्य चरणांत आरम्भीं जे दोन भृङ्ग गण समयक येतात ते पुष्कळदा अधिक मात्रांचे आढळतात; (∪ – ∪ ∪ ∪) या गणाच्या ठिकाणीं (– – ∪ ∪ ∪) अशी रचना आढळते आणि मग आद्यगुरु प्रयत्नें लघु अुच्चारावा लागतो !

२४७ 'शुभवदना' { [ | भृ | भृ ] जीवनलहरी अनेक
[ | भृ | भृ | भृ | – + ] परिलीना अेक }

(१) "श्रीगुरुचें चरणकमल हृदयीं ऽ स्मरावें. ध्रु०
रामदास सांङ्गे तुज
अजुनि तरी समज अुमज,
विषयवीष घेअुनिया फुकट कां मरावें !" (अकक ३/१५१)

(२) "नन्दतनयछन्द मला बाअि लागला गे ! ध्रु०
चहूंकडे कृष्ण दिसे,
बाअि, अितर मान नसे,
रात्रन्दिन हेंचि पिसें लागलें मला गे. १
मन्दहसितलसित वदन,
कुन्दमुकुलललित रदन,
केवळ जणु बाअि मदन, हृदयिं रङ्गला गे ! "२ (खाक ७३)

(३) रुणुझुणु ये, रुणुझुणु ये क्षणकारित वाळा !
दुदुदुदुदु दुडुदुडुदुडु दुमकत ये बाळा ! ध्रु०
धुन्दि अजुनि रजनिनयनिं
सावरुनि पदर घननि
शुभवदना शुद्धरदना देअि जाम्भयाला." १ (तासक १६१)

'प्रबोधन' (रेक १/७६), 'अजुनि लागलेंचि दार' (तासक ६७), 'मूकसङ्गीत' (गिका ९४), 'अजुन' (यघ ६४), आणि राजकवि चन्द्रशेखरकृत 'मधुर मधुर हेच झरे' (पामा १/६) अित्यादि अनेक कविता या शुभवदनाजातींत आहेत.

२४८ 'पुण्डरीक' { [ । मृ । मृ ] जीवनलहरी अनेक
[ । मृ । मृ । मृ । + ] धवलचन्द्रिका अेक }

( १ ) " पुण्डरीक म्यां वरिला,
याहुनि जरि अन्याला
स्पर्शीही वाहियला नाहि देह हा." ( देशाप ६/३ )

( २ ) " प्रिये अवन्तिके, नयनहृदयरञ्जिके ! ध्रु०
तू जीवन, तू भूषण,
परमार्थाचें साधन,
आहे मज तुजवाचुन सर्व जग फिकें !" ( विक १३ )

( ३ ) " मना काहि तरी शान्ति धरीं चिन्ति हरी रे ! ध्रु०
अपुले हे त्यजुनि ढङ्ग
सतत धरीं सन्तसङ्ग
निशिदिनिं भज पाण्डुरङ्ग,
भवजल तरण्यास असे हीच तरी रे." १ ( खाक ७६ )

'पाण्डुनृपति०' ( किम ५३ ) हें पद्य शिथिल आहे. 'लमाला जातों मी०' ( किम ४५७ ), 'लक्ष्मीसम चञ्चल०' ( देमृ ४३ ), 'नोहे हा जवन पवन' ( देमृ ५५), 'चिमकुला संसार' ( कावि ४८ ), 'हास बालिके !' ( माजुस्व ५३ ) आणि 'सीमा' ( काया ८ ) अित्यादि कविता या पुण्डरीकजातींत आहेत.

खालील तीन जातींच्या कडव्यांत [ । मृ । – ⏑ + ] या मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२४९ 'स्वर्गदेवता' { [ । मृ । – ⏑ + ] अनेक
[ । मृ । मृ । मृ । – ⏑ + ] अेक }

२५० 'कुसुमबाण' { [ मृ । – ⏑ + ] अनेक
[ । मृ । मृ । मृ । + ] अेक }

२५१ 'मञ्जुला' { [ । मृ । – ⏑ + ] अनेक
[ । मृ । + ] अेक }

२४९ 'स्वर्गदेवता' { [ । मृ । – ⏑ + ] दोन वा अधिक
[ । मृ । मृ । मृ । – ⏑ + ] मदनरङ्ग अेक }

(१) " कोण तू कुठोनि येशि, कां इकूच मन्दिरीं ?
मोहवी मनास रम्य हास्यतेज सुन्दरी. ध्रु०
तूं सती जगांतली
अप्सरा नभांतली
स्वर्गदेवता सजून येशि वा घरेवरी. " १ (गिका १३०)
(२) " अन्धकार मातला
वेष्टितसे भूतला
शून्य मना खिन्नपणें सुखदायक जाहला." (श्राक ६५)

बालकवींच्या या कवितेच्या १ कडव्यांपैकी शेवटलीं ३ निराळ्या म्हणजे अरुणजातीचीं आहेत. 'अुघड अुघड दार रे !' (अशा ८३) ही कविताहि स्वर्गदेवताजातीची आहे.

२५० 'कुसुमबाण' { [ । मृ । – ⏑ + ] दोन वा अधिक
[ । मृ । मृ । मृ । + ] धवलचन्द्रिका अेक

(१) " हृदय साङ्ग चोरिलें कशास सुन्दरी ?
देऽ ! देन देशि तरी दे तुझें तरी ! ध्रु०
(च) हन्त कोतवाल हा
'सज्ज गे शुभा पहा !
कुसुमबाण सोडवील मी तुझ्या अुरीं. " (तासक ४१)
(२) " हिन्दबन्धुनी, चला करीत हिन्दवन्दना
गौरवूं तिला कृती करून वीरनन्दना. ध्रु०
भक्तिनेच आळवूं
अन्तरांस मेळवूं
वैभवीं विराजवूं करून दूर बन्धना." (गिफ ३५)

२५१ 'मञ्जुला' { [ । मृ । – ⏑ + ] दोन वा अधिक
[ । मृ । + ] अेक

(१) अुगिच काय कुल्कुला ऽ, शिणविशी गळा ! ध्रु०
अुगिच कण्ठ फोडिशी,

तुट जाँय अन्न नाहिं दरवडे पाडिले
पडुनि नृप तापुनी चण्ड, जन ताडिले–
दे जयाचें तया वीरभद्रा !" । १ (तायक १२७)

(२) "या ऽरे सर्वथा मुक्त झालों. ध्रु०
रुक्मिणीने मला मन्त्र जो कथियला,
घुडुनिया होअिलचि सरल तो चाङ्गला;
काय करवील ती या नराला !" (किंम ५२१)

## वर्ग ४ था

### विषम जाति

#### प्रकार दुसरा

विषमजातीच्या पहिल्या प्रकारच्या व्याप्तींत ज्या विषमजाती येत नाहीत त्यांचा समावेश या वर्गात केला आहे.

२५७ 'यक्षपुरी' { [प । ⌣ +, अु । प । ⌣ +] सूर्यकला दोन
[अु । प । ⌣ +] पर्वती तीन
[। प । प । प । ⌣ + ।। अु । प । ⌣ +] अेक संयुक्त

"नील नभोमण्डलीं –० अस्फुट यक्षपुरी देखिली
धरुनी सुरुलावली, डोलती बघ पुढती नारळी
स्वदेहें याळावर सावल्या
कराया वात्सल्यें वाकल्या,
अेक या सळसळती झावळ्या,
अविरत त्यांची मर्मर ही का हुरहुर हृदयांतली
जरी मी कण्हतों ही आपुली." (कास ६१)

२५८ 'झपूर्झा' { [। प । – – +] अचलगति अेक
[। प] दोन
[। प । – – +] अचलगति तीन
[। प] दोन
[। प । – – +] अचलगति दोन

" हर्ष खेद ते मावळले
हास्य निमालें
अश्रु पळाले,
कण्टकशल्यें बोथटलीं,
मखमालीची लव वठली,
काही न दिसे दृष्टीला,
प्रकाश गेला
तिमिर हरपला;
काय म्हणावें या स्थितिला!
झपूऽर्झा गडे झपूऽर्झा " (केक ११२)

२५९ 'सदया' { [ – | प | – + ] अुद्धव अेक
[ – | प | – +, – ⏑ | + ] मालिभाला अेक
[ – | प | प | प | प | – + ] भवानी अेक
[ – | प | – +, – ⏑ | + ] मालिभाला अेक }

" मम हृदयीं जन्मा घेअीं,
ये सदया, येथे राहीं, ये प्रभो! ध्रु०
मी माझें छोडुनि जावो,
जग तुझेंच अवघें होवो ये, प्रभो!
मज म्हणोत कुणि दुर्भागि, बावळा, जोगि, मला क्षिति
नाहि, मला भय नाही,
तू माझा होअुनि राही हे प्रभो!" १ (अुख ३९८)

२६० 'अभिमता' { [ | मृ | मृ ] जीवनलहरी तीन
[ | मृ | मृ | + ] अेक
[ | मृ | मृ | मृ | + ] धवलचन्द्रिका अेक }

" सादृश कुठे पाहुं तुला सखि स्वतन्त्रते!
जनिं विजनीं सादृश कुठे रमवि सुमते!
तू धन मम, तूच मान

तू जीवन, तूच प्राण
तव सुचित मज प्रमाण
अजुनि किती अन्त पाहशी !
हो प्रसन्न मज प्रणता धीम अभिमते !" ( टिक २०२ )

पुरवणी

हराकर्नी समजाती

७४ अ देव [ | – ⌣ ⌣ – | – ⌣ ⌣ – | – ⌣ ⌣ – | + ]

" कोणि काही नका शिकवुं आता !
दोष लावूं नका व्यर्थ ताता !
देखि हातें मला तात ज्याशी
लग्न होतांचि तो देव मजशी " ( देवा. ८९ )

वर्ग ५ वा

स्वैरपद्य जाति

स्वैरपद्यासाठीं रा. व्यङ्कटेश शङ्कर वकील यांनी पद्मावर्तनीजातीचा, रा. आत्माराम रावजी देशपाण्डे यांनी अग्न्यावर्तनी जातीचा आणि रा. भवानीशङ्कर पण्डित यांनी भृङ्गावर्तनीजातीचा कसा अुपयोग केला आहे याचें विवेचन पहिल्या अध्यायांत ( पृ ३९-४३ ) सोदाहरण येअून गेलेंच आहे. अग्न्यावर्तनीजातीचा अुपयोग स्वैरपद्यासाठी केल्याचें आणखी अेक अुदाहरण, रा. वामन नारायण देशपाण्डे यांनी आपल्या 'चित्रवेडा' या अप्रकाशित काव्यांतून, कृपा करून पाठविलें आहे तें खाली देतों.

" चित्र आहे निस्तुकच हें बापुडें
हीन कोणी देहधारी कामिनी,
काय नकळे हेहि मतिला माझिया !
हासतां मग कासया !
काय परि करूं !
केवि तरि कथुं !

चित्र हें; नच देहिनी ही-हें कळूनहि मन्मन
चित्रितेच्या रूपदीप्तिस भाळलें!
शलभ आपण जाहलें!!" (चित्रवेडाकाव्य)

चरण मुख्यतः [।७।७।५] असा असून अर्थानुरोधानें तो लहानमोठा करण्यांत आला आहे.

---

अध्याय ७ वा

## छन्दश्छाया

गायकांच्या तोण्डीं असलेलें पुढील परम्परागत गीत पहा:—

तुझा । लाडका ग । यशोदा ऽऽ । माझी,
तुझ्या । हरीनें ऽऽ । खाल्लें माझें । दहीं. ध्रु०
पहिली । बोलली ऽऽ । सुताराची । बाळू
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । खेळतसे । वाळू. १
दुसरी । बोलली ऽऽ । तेलङ्ग्याची । गङ्गा,
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । घाली हरि । पिङ्गा. २
तिसरी । बोलली ऽऽ । ब्राह्मणाची । अुमा,
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । खेळे हरि । झिम्मा. ३
चौथी । बोलली ऽऽ । मराठ्याची । राणी,
तिच्या । अङ्गणीं ऽऽ । खेळे चक्र- । पाणी. ४

येथे चरणांतील पहिली टाळी तिसऱ्या अक्षरावर पडते, म्हणजे आघातालक-पूर्व गण दोन अक्षरी आहे. तथापि दहापैकी तीन चरणांत हा आघातालकपूर्व गण त्र्यक्षरी दिसतो.

पहिल्या टाळीने आरम्भ होणाऱ्या आवर्तनांत, ध्रुवपदाचा पहिला चरण वगळल्यास तीन तीन अक्षरें आहेत नि पुढे द्विमात्रक विराम आहे.

त्याच्या पुढील आवर्तनांत, पहिला चरण वगळल्यास चार चार अक्षरें आहेत. पहिल्या चरणांत त्या ठिकाणीं तीन अक्षरें असून पुढे द्विमात्रक विराम आहे.

तिसऱ्या आवर्तनांत सर्वत्र दोन दोनच अक्षरें आहेत.

हा अेक पद्मावर्तनी छन्द आहे. छन्दांत प्रत्येक अक्षर, मग तें दिसायला लघु असलें तरी गुरु अुच्चारायचें आणि गुरुच समजायचें असतें. सारींच अक्षरें गुरु म्हणजे द्विमात्रक मानायचीं हा छन्दाचा मूलभूत नियम असल्या-

मुळे छन्दांतील पद्यगण हा चार अक्षरांचाच असतो. लघु अक्षरच नाही म्हणून लगक्रमाचा प्रश्नच अुद्भवत नाही. म्हणून छन्दास लगत्वभेदातीत अक्षर-सङ्ख्याक पद्य म्हणतात.

परन्तु प्राचीन रचना सहेतुकपणें रेखीव अशी नाही. तिच्यांत मध्येच अेखादें अक्षर अधिक येतें. तेथे दोन अक्षरें त्वरेने अेका गुरु अक्षराच्या म्हणजे दोन मात्रांच्या कालांत अुच्चारायचीं असतात. हीं दोन्ही अक्षरें लघु असल्यास तीं दोन मात्रांच्या काळांत सहज अुच्चारितां येतात. वरील पद्यांत चरणारम्भीं पहिली, दुसरी, तिसरी हे जे तीन शब्द आले आहेत त्यांतील पहिलीं दोन दोन अक्षरें दोन दोन मात्रांच्या कालांत अुच्चारायचीं आहेत. असें शैथिल्य आधुनिक छन्दोरचनेंत तरी नसावें. छन्द कण्टाळवाणा होअूं नये म्हणून त्यांतील अक्षरांची सङ्ख्या न्यूनाधिक केली पाहिजे असें मुळीच नाहीं. अकारान्त शब्दांतील अन्त्य अकार गाळून अथवा अेक मात्रक अुच्चारून अुपान्त्य अक्षर अनुक्रमें चतुर्मात्रक वा त्रिमात्रक अुच्चारल्याने तेवढें वैचित्र्य आणितां येतें. गाव हा शब्द गाव ऽ असा अुच्चारण्याच्या ठिकाणीं गाऽऽव् अथवा गाऽव असा अुच्चा-रितां येतो. पुन्हा हा भेद वैकल्पिक आणि वैयक्तिक अुच्चारापुरताच असल्याने पद्याच्या स्वरूपांत विकृति कोणतीच होत नाही.

छन्द केवळ अक्षरसङ्ख्याक नसतो. छन्दांतहि लयबद्धता असावी लागते. प्रत्येक अक्षर द्विमात्रक असल्याने छन्द हे पद्मावर्तनी वा भृङ्गावर्तनी असतात; ते अग्न्यावर्तनी वा हरावर्तनी असूं शकत नाहीत. पण छन्दांची मोडणी ही जातिमोडणीसारखीच असते. जातींत जितक्या सशब्द मात्रा असतात त्याच्या अर्धपट अक्षरें त्या छन्दांत असायचीं. छन्दांत मागे छान्दस वा पुढे छन्द हा शब्द ठेवून जातींचींच नावें छन्दांना दिलीं तर पारिभाषिक संज्ञांची सङ्ख्या तितकीच परिमित राहील. छन्द पादाकुलक म्हटलें की मात्रालेखन [ । प । प ] असेंच होणार; पण अक्षरें मात्र आठच असणार आणि टाळी अर्थात् पहिल्या नि पाचव्या अक्षरावर पडणार. छान्दस रचना ही स्थूल असल्याकारणाने अेकाच पद्याच्या अनेक मोडणी क्वचित्कदा सम्भवतात. शब्द कोठेहि तुटला तरी कानाला तें तितकें कटू लागत नाही. तथापि छन्दांतहि शब्द भलत्या ठिकाणीं तुटूं नये याविषयी काळजी घ्यायलाच पाहिजे. जातींत जेथे अपरिहार्यपणें यति येतो त्या ठिकाणीं छन्दांतहि यति पाळायलाच हवा.

पद्याचें विषमाक्षर आणि समाक्षर मिळून ऐखादा अक्षरी शब्द नसावा. '। कां लोक धा – । वती असे' यापेक्षा '। लोक कां धा – । वती असें' म्हणणें कानाला अधिक चाइगलें लागतें.

मराठींतील अभङ्ग, ओवी, घनाक्षरी अित्यादिकांची रचना छान्दस आहे. खिस्ती अुपासनासङ्गीतांत 'अिङ्ग्रजी चालींवर' म्हणून जीं पद्यें दिलीं आहेत तीं वस्तुतः छन्दोरूप आहेत. संस्कृतांत आणि प्राकृतांत न आढळणारी ही लगत्वभेदातीत छन्दोरचना मराठींत आढळते. अगदी आरम्भापासून आढळते ही गोष्ट चिन्तनीय आहे. टोकळ मानाने त्याला अनुसरणाऱ्या लोकगीतांपासून छन्दाचा अुगम झाला असावा. शिशुगीताला म्हणूनच छन्द योग्य वाटतो.

ओवीची रचना अनियमित वाटते. महानुभाव लोकांत शके १५०० च्या मागेपुढें भीष्माचार्य नामक ग्रन्थकाराने आपल्या मार्गप्रभाकर नामक ग्रन्थाच्या ज्ञानखण्डांत ओवीचें पुढील प्रमाणे यान्धलेलें लक्षण विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनी आपल्या मराठी छन्द या पुस्तिकेंत अुद्धृत केलें आहे:–"गायत्री छन्दापासौनि धृतिपर्यन्त। ग्रन्थ वोवियाचे तीन चरण जाणावे निश्चित। प्रतिष्ठेपासौनि जगतीपर्यन्त। चौथा चरण." या लक्षणांत गायत्रीच्या ठिकाणीं सुप्रतिष्ठा आणि प्रतिष्ठेच्या ठिकाणीं मध्यमा अशी सुधारणा राजवाडे यांनी सुचविली आहे. ओकूण काय लेखी ओवीचें स्वरूप फारच अनियमित आहे.

परन्तु ओवी हा गेय पद्यप्रकार होता असें दिसते. सङ्गीतरत्नाकराच्या प्रबन्धाध्यायांतील पुढील अवतरण प्रो. ग. ह. रानडे यांनी माझ्या दृष्टीस आणिलें आहे:—

> " खण्डत्रयं प्रासयुतं गीयते देशभाषया
> ओवीपदं तदन्तेचेदोवी तज्ज्ञैस्तदोदिता
> त्रयाणां चरणानां स्युरेकाद्यावृत्तितो भिदाः
> आदिमध्यान्तगैः प्रासैरेकादैश्च पदे पदे
> छन्दोभिर्बहुभिर्भेया ओव्या जनमनोहराः
> सानुप्रासैस्त्रिभिः खण्डैर्मण्डिता प्राकृतैः पदैः "

त्या गेय ओव्या आजीबाओींच्या आणि मुलीबाळींच्या तोण्डून अद्यापि अैकायला मिळतात त्यांतील यौँचित्य मर्यादित दिसतें. आणि त्या ऐकून ज्या

दोन्ही प्रकारच्या ओव्या यापुढे समाक्षरक रचणें श्रेयस्कर होईल.

कित्येक छन्दांत जो आवर्तालकपूर्व द्यक्षरी गण आढळतो तो वस्तुतः द्विमात्रक असावा अशी शङ्का म्हणण्याच्या घाटणीवरून येते. तसा तो अभ्यास रेखीव पर्यात तो अेकाक्षरीच असावा हें अिष्ट होय.

समाक्षरक ओव्या कशा वाटतील हें परम्पराप्राप्त ओव्यांतूनच काही निवडून पाहूं. यांना पुढे देवदार, तुळशी आणि पुष्पगुच्छ हीं नावें दिलीं आहेत.

(१) " । अद्गार्अीचे । घरीं
। मद्गार्अी ग । गेली
। सवद्गार्अी । झाली
दाणे । खावी.

(२) पा –। वळा काका । करी
घ –। राच्या आढ्या । वरी
पा –। हुणा घोड्या –। वरी
भाअूराया.

(३) फूल । फूल घोसा –। ळिये
फूल । गेलें ग । घोसांत
तुझें । सासर दे –। शांत
अम्नू –। बाअी " ( दालो २/६५ )

अमङ्गाचा अेक प्रकार या ओव्यांतील पहिल्या प्रकारासारखाच असतो हें सहज ध्यानांत येण्याजोगें आहे.

## वर्ग १ ला

### समछन्द

#### पद्मावर्तनी

१ कपिवीर छन्द [ । प । प । प । प ] – – ] १८ अक्षरें

" गायका तू गोंल गायी की ओतिशी सुधेचा कलश,
मधुरता स्वरांतली अलौकिक गमते मनास;

देवांचा का गवअी तू! गन्धर्व-लोकीं का तुझा वास!
तरीच का तेथली ये गोडी तुझ्या येथल्या गानास!"
(देवाना—विमा १/५)

२ वनहरिणी छन्द [।प।प।प।प] १६ अक्षरें

(१) "आटपाट नगरांत नान्दे राजाची ग राणी
नाव मैनाअी तियेचें रूप गोड फुलावाणी.
नाही नोवऱ्याचा पत्ता, कुलशील न माहीत
चौदा चौकड्यांचें राज्य तिच्या होतें पदरांत." (कोल ७१)

(२) "शोभिवन्त फूलपात्रीं ठेवियलीं फुलें दोन
कुणी रचनाकुशलें आणिलीं जीं निवडोन,
परिचय क्षुपचार अशालागी कसा व्हावा?
पटे निःशब्द ओळख समदुःखींतुलीं जीवा."
(काकेना—ज्योमा १/३)

३ हरिभगिनी छन्द [।प।प।प।---] १५ अक्षरें

(१) औश्वराची दया किती याहूंग तिचा लागेना
न्यायीं तरी त्याची प्रीती सिन्धू अेवढी जाणा. १
देच बोले प्रेमें फार्। टाकी माझ्यावरी भार्. ध्रु०
सर्व कष्टी छर्वे दुःखी ओशियांनी कण्हती
अैकूं जातें दिव्यलोकीं प्रीति तेथे वसती." २ (अुश ३३)

(२) "चाल बाअी चाल माझी, चाल सअी चाल ग
कोवळे हे पाय मअू मखमल लाल ग
अवघाले पाय तुझे, गोरे गोरे हात ग
चाल चाल, भिअूं नको, मोत्या माअू हात ग!"
(देथ—आमा अेप्रील १९३४)

या छन्दाचीं अुदाहरणें अुपासनासङ्गीतांत विपुल आहेत.

४ वैकुण्ठ छन्द [।प।प।---ऽऽ।---] १४ अक्षरें

(१) "तुकाराम म्हणे, जिवा तू माझी —० बायकू
वैकुण्ठाला चल नको कोणाचें —० आयकू" (मागू)

(२) "पातरांची शाळा भरे पिंपळा —० वरती
चिमण्यांचीं पोरें भारी गोड्गाट —० करिती.
अुतरतें अून, जाते टळूनी —० दुपार
पारावर जसा यांचा भरतो —० बाजार." ( पारा ६६ )

मायदेवकृत 'गोकुळ' (मामा ७४) या कवितेची रचना शिथिल आहे.

५ लवङ्गलता छन्द [ । प । प । प । – – ] १४ अक्षरें

(१) "सौरी झालें जनीं
राम केला धनी. ध्रु०
शान्तिगुन्ती घेअुन् हातीं भक्तिचोळी ल्याली,
मीतूपण ठावें नाही विसरून गेली.
कर्म नेणें धर्म नेणें, नेणें आम्ही काही
ज्ञानदेव म्हणे आम्हां येणें जाणें नाही." ( ज्ञानग १/६ )

(२) "येअीं गा तू येअीं गा तू पण्ढरीच्या राया
तुजवीण क्षीण वाटे, क्षीण झाली काया,
याति हीन मति हीन, कर्म हीन माझें;
दीननाथ दीनबन्धु नाम तुम्हां साजे.
विटेवरी अुभा नीट कटीवर कर,
तुका म्हणे आम्हां हेचि ध्यान निरन्तर." ( तुका-पस १/८१ )

(३) "ये ग ये ग चिअू. ध्रु०
हात हलवून तुला किती वेळा बाहूं ? १
तुझ्यासाठी कापसाचें घर केलें मअू." २
( मायच्यं-आमा जुलै १९३६ )

ज्ञानेश्वर पृ. ७७, पद्य ३१ वें (चित्राशाळा प्रत), तुकाराम (२/१५०, अभङ्ग क्रम २४९९-२७५२ अिंदुप्रकाश गाथा.), 'रूपगर्विता' ( देवाना-कार ४०/७ ) 'सुना, सुना' ( माअ ८ ), 'वाघाचें गाणें' ( खेप्र १७ ) अित्यादि गीतें या छन्दांत आहेत.

६ शुक्रकला छन्द [।प।--,--।प।--] १४ अक्षरें

" तरीच् मशी बोल पोरा जिव्हाळ्याची ओल.
मशी घेतां भास जीवा, मीतूपणा नास.
मजसवें खरा पण जाऊं नेदी घरा.
आमुचिये रङ्गीं दुजे तगेना ये सङ्गीं.
तुक्यासवें भास हरी जीवा करी नास." (अभङ्ग ११४ वा)

७ दयिता छन्द [।प।---ऽऽ।प।--] १३ अक्षरें

" अेकान्तीं जा सकाळीं–०तसा दुपारीही
तसेंच सन्धिकालीं–०फिरून रात्रींही;
मनांतून टाकूनी–०विषयवासना
विनम्रता धरुनी–०करीच प्रार्थना." (ध्रुव ४२८)

८ चन्द्रकान्त छन्द [।प।प।प।-] १३ अक्षरें

(१) " भज रे मना रे या रे भज रे मना
रामकृष्ण वासुदेव भज रे मना
आता काय नरदेह येओल पुन्हा !" (प्राचीन पद्य)

(२) " अखण्डित असावेसें वाटतें पायीं.
साहोनी सङ्कोच ठाव थोडासा देयीं.
असो नसो ठाव आलों तुझिया ठायां.
पाहें कृपादृष्टी मज पण्ढरीराया !
तुका म्हणे आम्हीं तुझीं वेडीं वाकडीं,
नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं." (तुकाराम पृ. १८७)

(३) " यया मादरी वेर्या किती आहे तरी गोड्
अुतर ना खाली वेर्या, जरा तरी ओड्." (माभ ११)

श्रीयुत वामन नारायण देशपाण्डे यांचें 'कपटवेष' हें नाटक याच छन्दांत पण निर्यमक आहे. आरम्भींच्या ओळी अशा:—

रमणी—" अुरे, ठेव आवरून पूजासाहित्य.
झाली बाभी यथासाङ्ग पूजा अवघी
सन्ध्ये, सार वाती जरा समर्थीतल्या

शुभा— निर्के महाराज—

रमणी— मूर्खे, चोखणवी का!

महाराज गे मी आहे की महादेवी."

९ दोहा छन्द [।प।---ऽऽ।प।+] १२ अक्षरें

" गृहाप्रति ममता —० देअी शोभा फार्
प्रेम तेथे वसतां —० सुख नान्दणार्
शान्ति तेथे राहती
तृप्ति तेथे नान्दती
वेळ वेगें क्रमती —० सर्व साधणार् १
गृहीं जया ममता —० क्रोध न तिथे
प्रेम गृहीं वसता —० न हेवा तिथे
झोपडींत नान्दलों
दुक्खहानि पावलों
प्रेम सद राहिलों —० सर्व साहये ". २ (शुभ ४५२)

या छन्दाच्या कडव्यांत अन्तरा आहे.

१० चक्रपाणि छन्द [--।---ऽऽ।प।--] ११ अक्षरें

" पहिली बोलली —० सुतराची साळू
तिच्या अङ्गणीं —० खेळतसे बाळू
दुसरी बोलली —० तेलङ्ग्याची गङ्गा
तिच्या अङ्गणीं —० धाली हरि पिङ्गा
तिसरी बोलली —० ब्राह्मणाची शुमा
तिच्या अङ्गणीं —० खेळे हरि झिम्मा
चौथी बोलली —० मराठ्याची राणी
तिच्या अङ्गणीं —० खेळे चक्रपाणी " (प्राचीन पद्य)

११ वंशमणि छन्द [।प।प।--] १० अक्षरें

" निखळून गगनांमधून
पडता हें वेगें कोसळून

कोणी तरी अदृश्यचि कर
खाली खाली ओढी अनिवार "

( देवाना–रमा ८।२ )

१२ पादाकुलक छन्द [ ।५।५ ] ८ अक्षरें

( १ ) " कान्हा वाटे देव भेटे
हातीं पायीं तोचि दाटे.
ओळखिला देव राजा,
सर्व शोक गेला माझा.
समरङ्गीं रङ्ग गेला
रङ्गेंवीण रङ्ग केला. " ( केस्वा–पस १/२११ )

( २ ) " ऐशी ऐकोनिया वाणी
नेत्रानें झुघडी राणी,
वाटे मनास निरोपा
पावला भूपति तोषा ". ( मोधारा २/७ )

( ३ ) " सेवितां श्रीगुरुकुळ
ब्रह्म त्रैलोक्य गोकुळ
दासपुत्र अनुकूल
आहे आहे नाही नाही." ( अक १३ )

( ४ ) " मिठी हातां हातीं पडे
दिठी दिठीवरी जडे
अपुल्या ग हृदयाचे
सुरू झाले हे पवाडे.
मधुरात ही चान्दणी
खुले मोगरा अङ्गणीं
परिमल दरवळे
मन्द वायु श्वासांतूनी. " ( पवन–चामा ५/१ )

१३ अचलगति छन्द [।प।---] ७ अक्षरें

(१) "काय साङ्गो तूज गा
अन्तरींचें गूज गा!
मोलें हाता येईना,
बोलें प्रात होईना;
द्वैतसङ्ग साण्डूनी
राहे तूंचि माण्डूनी." (केस्वा-पस १/२०७)

(२) "देवस्तुति वाढवा
त्याची दया गाजवा
अीश्वराची करुणा
सर्वकाळ सरेना." (भुस ३१)

'मातुकलीचें गाणें' (माजूल १०८) 'आभाळाच्या अङ्गणीं' (पचचा) आणि 'सुरो सुरो भूठ ग' (माश्र १) या कविता या छन्दांत आहेत.

१४ देवीन्वर छन्द [--।प।--] ८ अक्षरें

(१) "रूप पाहतां लोचनीं
सुख जालें वो साजणी
सर्व सुखाचें आगर
बाप रखुमादेवीन्वर" (ज्ञानदेव)

या छन्दांत पहिल्या दोन अक्षरांचा गण आयतालक पूर्व असल्यानें त्याच्या अन्तीं बहुधा शब्द पुरा व्हावा लागतो. अभङ्गरचनेंत हा गण कित्येकदा मध्येच गाळलेला दिसतो.

(२) "घेमी घेमी माझे वाचे,
गोड नाम विठोबाचें.
तुका म्हणे जीवा,
नको सोडूं या केशवा."

(३) "शुद्ध बीजा पोटीं
फळें रसाळ गोमटीं.

मुखीं अमृताची वाणी
देह वेचाया कारणीं.
सर्वाङ्गीं निर्मळ
चित्त जैसें गङ्गाजळ.
तुका म्हणे जाती
ताप, दर्शनें विश्रान्ती."

(४) "नको देवा कधी देऊं
कुणा परतन्त्र जिणें
त्याच्याहून दारोदारीं
बरें भिक्षान्न सेवणें." (कावि ८८)

(५) "माझ्या छकुलीचे डोळे
दुध्या कवडीचे डाव
बाजी कमळ कमळ !'
गोड चिर्डीचें ग नाव." (कोल ५६)

या छन्दांत त्रिपद्यांची आवलि रचणें बरेंच कविप्रिय झालें आहे.

(६) "आकाशीच्या अन्तराळीं
तारकांना तेज चढे
तुझी माझी प्रीति जडे." (अफु ६१)

**२५ भुद्रव छन्द** [-। प। --] ७ अक्षरं

(१) "दिवस मावळूं दे,
विद्यु दे निमिषांत
प्रकाश दिवसाचा
वाढल्या तिमिरांत." (देवाना-विधी १३७)

(२) "कासया घोङ्गावून
स्फुन्दशी मनद्रणा ?
चहाळ लागतांच
दचके माझा कान्हा."
(देवाना-रमा मे-जून १९२९)

१६ शुद्धसती छन्द [ ।प। – – ] ६ अक्षरें

( १ ) " आसवांच्या माळा
साठवूं या किती ?
घालाया त्या गळां
वाट पाहूं किती ?
दीप पाजळिला
अखण्ड ही वात
धीर दे ये तिला,
वाहे झन्झावात. " ( देकु–यमा १७/१८ )

'कमी आणि ठमी' ( माथ २४ ) 'डोला बाभी डोला !' ( माजूल १५४ ) आणि 'बोकोबा' ( मादि ४ ) या कविता याच छन्दांत आहेत. या छन्दांत अन्त्यावर्तनांत जीं दोन अक्षरें असतात त्यांचा बहुधः अलग शब्द असल्याने तो पुनरुक्त करितां येतो. परन्तु तेवढ्याने छन्द निराळा होत नाही.

( १ ) " आहे घरें आभी आभी
रडूं नको काही काही
घालितें मी तोतो तोतो
करितें मी जोजो जोजो " ( मादि ५ )

१७ गजवदन छन्द [ ।प। – – ऽऽऽऽ।प। – – ] १२ अक्षरें

हा छन्द शुद्धसतीछन्दाच्या द्विरावृत्तीने होतो.

( १ ) " जाडींचें घोड्गडें –० येव्हढांये राती
कानींची कुण्डले –० करी जग ज्योती
होय न हो अैसा –० संशय गमला
निर्धारितां विश्व –० व्यापक देखिला
हृदयमन्दिरीं –० दाटोनी धगवा
ही च खूण साच्ची –० मानुदास देवा. "
( तुकारामतात्यासम्पादित अेकनाथ गाथा पृ. १४१ )

(२) " गजवदना रे –० गजवदना रे
नमितों तुजला –० गजवदना रे
मध्यनायर्किर्ती –० वाटे तुझी खन्ती
येशी धावोनिया –० गजवदना रे. " ( ममुक २ )

(३) " यज्ञ शम्भरावा –० होतांच पुरता
गमे भूपा झाली –० जन्म सफलता
कुणा दे दक्षिणा –० कुणा देशी भूमी
याचकां सन्तुष्ट –० करी अन्तर्यामीं
घडविली तेणें –० यज्ञ पुरुषाची
कलाकुसरीची –० प्रतिमा सोन्याची. "
(देवाना–विमा १/९)

(४) " आलेलें भरासी –० देवा रे कणीस
मोडूनी दयाळा –० लाविसी भिकेस
मळा पिकविला –० माझ्या भावनेचा
बिन्दु बिन्दु माझ्या –० गाळून श्रमाचा "
(पा–फ ३०)

२८ भुवनसुन्दर छन्द [ – – । प । – ] ७ अक्षरें

(१) " नाना बाहुली माझी
बघा कोनाड्यामाजीं
तिला पिसांची गादी
तिची रेशमी साडी." ( माजूरव १०८ )

(२) " बघ चान्दोबा आओ
माझ्या सङ्गती येओ;
बिम्ब आभाळीं हाले
माझ्या सङ्गती चाले. " ( गिका १० )

२९ पिदाक्षा छन्द [ । प । – ] ६ अक्षरें

(१) " दृश्यातीत रे
सदोदित रे

भगवन्त रे
नान्दे नित्य रे
रूपें पीन रे
परिपूर्ण रे
नारायण रे
आहे जाण रे" (केसा–पद्य १/१५०)

या छन्दाची मोडणी [।भृ।––] अशीहि होईल, मात्र त्या मोडणीला सहेतुकपणें अनुसरून रचना केल्यास शब्द निराळ्या रीतीने बसतील. अुदाहरणार्थ 'अिवला सप' (देनाथ–ओ ६) ही कविता पहा.

'काअू काअू गे!' (माजुल्व ११९) ही कविता या छन्दांत आहे.

२० "आन्दोलन" छन्द [।प।–ऽऽऽऽऽऽ!प।–]

(१) "देव घ्या कोणी देव घ्या कोणी
आयता आला घर पुसोनी
देव नलगे देव नलगे
सांठवणेचे रुधले जागे
तुटला तुका हा भावेविणें
अुधारा देव घेतला रिणें." (तुकाराम पृ. ३५८)

(२) "ताअी गुणाची माझी छकुली
झोका दे दादा म्हणूं लागली.
साम्भाळ ताअी फान्दी वाकली
दोन्ही दोरांना गच आवळी
जो जो गे जो जो! (दक ६२)

(३) "तीन चाकाचा गाडा रङ्गीत
बाळ अैटीने नेअी रेटीत
चौफेर हिण्डे खेळत हसे
दृष्टि त्यावर ठरत नसे"
(मञ्जुबाळ–आमा जुलै १९१३)

'प्रभुसहवासार्थ विनन्ती' ( अुसं ४३६ ) आणि गोपीनाथकृत 'आमची अिन्दु' ( गोदू ७ ) या कविता आन्दोलन या छन्दांत आहेत. पुढे पहा.

२१ पद्म छन्द [ | प ] ४ अक्षरें

" काळा काळा
मह्या आला
नीज बाळा
लाव डोळा." ( पचचा ४० )

२२ 'विठ्ठल' छन्द [ | - - - ] ३ अक्षरें

( १ ) " जीव तू
प्राण तू
आत्मा तू
विठ्ठला." ( नामदेवगाथा पृ. ७१ )

( २ ) " ये काऊ
घे खाऊ
दे दाणा
वाटाणा." ( पचचा २६ )

मृङ्गावर्तनी

२३ दासी छन्द [ । भ । भ । भ । भ ] १२ अक्षरे

" तू प्रिय, हे प्रभु, तू प्रिय अपार
तू प्रिय, हे येशु, त्वां केला अुद्धार
मला तू सुप्रिय, हें कैसें दावांन !
सम्पूर्ण शक्तीने मी तुला सेवीन !" ( अुस ३४२ )

२४ परिलीना छन्द [ । भ । भ । भ । - - ] ११ अक्षरें

( १ ) " अैगा गे माय ऽऽ कैसा हा योगी
जे टापीं जन्मला तें टाप भोगी. ध्रु०
आत्मार सम्जोनीं हालगे प्राट
मायनीयी जेनें लाविला पाट." ( शा-पस १/२। )

( २ ) " ज्याचा तो जाणे ऽऽ ज्याचा तो जाणे
जाणीव निमाली त्याचीच वाणे
जनीं जनार्दन जाणोनि वागे
पदोपदीं त्यासि समाधि लागे
स्वसुखसागरीं हरपे चित्त
ठायींच्या ठायीं ऽऽ पूर्ण निवान्त." ( केस्वा–पस १/२११ )

( ३ ) " स्वागताच्या केला अभ्यर्णी थाट
बघत बैसलें तुझीच वाट
आईसम भुन्द तरूची शाखा
तिच्या खाली बघ बान्धिला झोका
समीती शीतल सावली दाट." ( गां–यमा ३८ )

( ४ ) " ओकत्र गुम्फून जीवन-धागे
प्रीतीचें नर्तन नाचलों मागे,
ओकटा अुभा मी तेथे
भोवती शोधीं प्रियेतें;
न दिसे कोठे; का सोडून गेली!
लोपते का कधी प्रीति अुदेली!" ( माजूत्व ७९ )

२५ जीवनलहरी छन्द [।भ्र।भ्र] ६ अक्षरें

( १ ) " धडाड धडाड
खडाड खडाड
धावते ही गाडी
केवढी धडाडी!" ( माजूत्व १११ )

'हें कोण गे आओी!' ( तासक ८० ) आणि 'वाघाची मावशी!' ( मादि ७ ) या कविता या छन्दांत आहेत. तिसऱ्या अक्षरानन्तर द्विमात्रक विराम घेतला तर छन्द पद्मावर्तनी होओील.

( २ ) " नदीच्या ऽऽ पैलाड
दामाजी ऽऽ सोनार " ( मुलाबाओीचे गाणें )

याच्या पुढील ओळी

" त्याने घडविला
साखळ्यांचा जोड "

यांत तिसऱ्या अक्षरानन्तर यति नसल्याने त्या

| त्याने घड — | विला
| साखळ्यांचा | जोड

अशा म्हणाव्या लागतात. हे चरण अर्थातच [ | भृ | भृ ] या छन्दांत बसूं शकत नाहींत. त्या शुद्धयती छन्दाच्या आहेत.

२६ निर्झरगीत छन्द [ | भृ | — — ऽ ऽ | भृ | — — ⌒ ]

" निवला झरा गायन गात
चान्दण्यासवें हासली रात
हालेना जरा वेलींचें पात
निजली धरा निजलें रान. "

( देनाभ—ओ ६ )

या छन्दाची मागील आन्दोलनच्छन्द अवश्य ताडून पहावा.

वर्ग २ रा

अर्धसम छन्द

पादावर्तनी

२७ 'प्रमाद' छन्द { [ — — — ऽ ऽ | — — —, — | — — — ऽ ऽ | — — — ]
[ प | प | — — — ऽ ऽ | — — ⌒ ] चक्रपाणि

पोर ही —० सानुली की सोन्याची —० बाहुली,
देव दिव्यावर ठेवी मायेची —० साउली.
सुन्दर —० हसते नि मोहक —० रुसते,
ठेसकार्जीने ही कशी चालते —० बसते !
बोबडे —० बोलते नि हृदय —० खोलते,
मन माझें बोबड्या या बोलांनी —० डोलतें.
थापेच करते ही धडली —० मागते,
गोडीहून म्हाला त्याला परी ही —० आवडे.

संसारसङ्ग्यॉं दोघी
नित्य गुन्तलों कामा.
तारुण्य-अभिमान,
देहीं मरला ताठा
वैभव-सम्पत्तीचा
अङ्गीं फुटला फाटा" ( अे-पद्य १/६९ )

( २ ) "काय तें तुज साङ्गूं ?
नये साङ्गतां कोणा.
वृत्तीसी ठाव नाहीं
कैंचा दाखवूं खुणा !" ( केसवा-पद्य १/६९७ )

या छन्दांतील 'धाव रे रामराया' हें रामदासी पद्य सुप्रसिद्धच आहे.

मृङ्गावर्तनी

२४ "सङ्कित्त छन्द" { [ । मृ । मृ । मृ । मृ ] १२ अक्षरें
[ मृ । मृ । – – ] ८ अक्षरें

"मोकळे हातीं ऽऽ सोडिल्या गाठी
विकन्या घातले कण
ज्याचे भाग त्यासी देअूनी वारिले
सारूनि लिगाड दान
खरें माप हातीं घेअूनि बैसलों
मानिती ते चौघेजण
खरें वित्त तेथे आले चोजवीत
गिऱ्हाअीक सन्तजन". ( तुकाराम २/पृ. ३०९ )

वर्ग तिसरा

विषम छन्द

१ ला प्रकार

३५ 'अग्निमेघ' छन्द { [ । प । प । प । – – – ] दोन चरण
[ । प । प । – – – ] अेक चरण

